


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष ८ : अंक १ : हिवाळा १९९०





अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन-समिती :** अशोक रा. केळकर (प्रमुख), कल्याण काळे, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए-२ परिमल, १२३९-ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ५२००९)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** ए-२ परिमल, १२३९-ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ५२००९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी विजया देव / मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

# ' लिंग्विस्टिक कोड ' आणि भाषेची कोडी

भारत जगामध्ये वेगवेगळ्या आश्चर्यांसाठी प्रसिद्ध आहे. त्यांतली दोन शाळेमध्ये सामान्यज्ञानाच्या तासाला शिकवली गेली होती. पहिलं म्हणजे भूतलावरचं नंदनवन काश्मीर भारतात आहे; आणि दुसरं आश्चर्य म्हणजे, शहाजहान बादशहानं बांधलेला सुंदर संगमरवरी ताजमहाल.

पुढं जसं-जसं वय वाढत गेलं, तसतसं भारत आणखी वेगवेगळ्या कारणांसाठी आश्चर्य-भूमी म्हणून ओळखला जातो, असं लक्षात यायला लागलं. परकीयांना भारत म्हणजे सापांचा आणि बैराग्यांचा देश वाटतो. भारतात शेकडो वर्षं अंधश्रद्धा निर्मूलनाच्या चळवळी होऊनही बैराग्यांची संख्या कमी होण्यापेक्षा वाढत जाते, हे आणखी एक आश्चर्य.

भारतीय लोकसमूह अनेक भाषा आणि अनेक जातींत विभागला गेलेला. आर्थिक-सामाजिक विषमता इथे प्रचंड प्रमाणावर. अलीकडे धार्मिक तणावांनी अत्यंत उग्र रूप घेतलेलं. या परिस्थितीत भारतासारख्या खंडप्राय देशात लोकशाही टिकून राहते, हेही एक आश्चर्यच. सामाजिक आणि राजकीय प्रश्नांचं भान जसं वाढत गेलं, तसा या आश्चर्याचा प्रत्यय यायला लागला.

भाषावैज्ञानिक दृष्टीनंही आश्चर्य वाटतील, असे भाषांचे नमुने भारतात आहेत, याचा अनुभव पुन्हा एकदा औरंगाबाद इथं झालेल्या चर्चासत्राच्या निमित्तानं आला. कोणत्याही बोलीचा अथवा भाषेचा अभ्यास करायचा असेल, तर तो त्या भाषेतील साहित्याच्या आधारे करून चालत नाही. त्या बोलीचे अथवा भाषेचे औच्चारिक नमुने गोळा करून, त्यांच्या आधारे त्या भाषेचा अभ्यास करायचा, ही भाषाभ्यासाची वैज्ञानिक पद्धत आहे. औच्चारिक नमुने गोळा करण्यासाठी ती भाषा/बोली बोलणाऱ्या अशिक्षित माणसाकडून असे नमुने गोळा करावेत, हा आग्रह आधुनिक भाषाभ्यासात धरला जातो. कारण अशिक्षित माणसानं त्या बोलीचं मूळ रूप टिकवलेलं असतं. त्याच्या भाषेवर प्रमाण भाषेचा किंवा इतर परकीय भाषांचा फारसा परिणाम झालेला नसतो.

औरंगाबाद इथं मराठवाडा साहित्य परिषदेनं आयोजित केलेल्या चर्चासत्रातील समाज-भाषाविज्ञानावरील सत्रात हा मुद्दा मांडला गेला. उपस्थितांपैकी एकानं प्रश्न विचारला, ' झोपडपट्ट्यांमध्ये अशिक्षित माणसं राहत असतात, तेव्हा त्यांच्या भाषेचं काय ? ' उत्तर द्यावं लागलं, ' खेड्यांतून स्थलांतरित होऊन शहरांत आलेले लोक झोपडपट्ट्यांत राहत असतात. त्यांच्या आजूबाजूला राहणाऱ्या अन्य जातींच्या आणि अन्य भाषा बोलणाऱ्या

समूहांच्या भाषेचा झोपडपट्टीतल्या माणसाच्या भाषेवर परिणाम होतो. त्यामुळं झोपड-पट्टीतला माणूस अशिक्षित असला, तरी त्याच्या भाषेचा वेगळया तऱ्हेनं विचार करावा लागतो.'

हा विषय चर्चासत्राच्या दृष्टीनं इथं संपला; पण मनात रेंगाळत राहिला.

वेश्यांच्या वस्त्यांमधील आणि शहरांतील झोपडपट्ट्यांमधील भाषेचं स्वरूप भाषिक दृष्ट्या फारच गुंतागुंतीचं असतं. वेगवेगळ्या धर्मांचे, जातींचे आणि वेगवेगळ्या प्रांतिक भाषा बोलणारे लोक अशा वस्त्यांत एकत्र राहत असतात. त्या शहरात बोलली जाणारी प्रमाण भाषा आणि संपर्क भाषा यांचा उपयोग गरजेनुसार या भाषकांना करावा लागतो. शिवाय या स्तरांच्या स्वतःच्या व्यवसाय-भाषाही असतातच. (अशा वस्त्यांमधील ८ ते १२ वयोगटातील मुलं भुरट्या चोऱ्या, स्मगलिंग, दारू-चरस-गांजा यांची ने-आण, इत्यादी व्यवसायांत मोठ्या प्रमाणावर असतात. या व्यवसायांच्या त्यांच्या त्यांच्या संकेत भाषा असतात.) अशा भाषिक अडचणींमुळे झोपडपट्टीतील मुलांना प्राथमिक शिक्षण देणं अड-चणीचं होतं. झोपडपट्टीतील प्राथमिक शाळांमधील भाषाशिक्षणाची अवस्था मांडणारा डॉ. विजया चिटणीस यांचा लेख 'भाषा आणि जीवन'मध्ये प्रसिद्ध झालेला आहे. (वर्ष २ : अंक १)

खेड्यांतील भाषा तरी आज अविकृत राहिली आहे का? सामाजिक कामाच्या निमित्तानं खेड्यात जाण्याचे प्रसंग बरेच वेळा येतात. त्यांतला एक प्रसंग आणि एक संवाद आठवला.

कऱ्हाडपासून वीस किलोमीटर अंतरावर विंग नावाचं गाव आहे. गावाची वस्ती असेल साधारण दोन-तीन हजार. तिथल्या जनवादी महिला संघटनेनं ८ मार्च या जागतिक महिला दिनी स्त्रियांचा मेळावा आयोजित केला होता. मला व्याख्यानासाठी बोलावलं होतं. बरोबर कम्युनिस्ट पार्टीचे एक कार्यकर्ते होते.

आम्ही तीनच्या सुमारास गावात पोहोचलो. पाच वाजता सभा सुरू होणार होती. पाहुणचार, चहापाणी ओळखी वगैरे झाल्यावर संयोजकांनी आणि गावातल्या कार्यकर्त्यांनी सभेचं 'प्लॅनिंग' सुरू केलं.

'आक्का, काय आहे आजच्या मीटिंगचं प्लॅनिंग?'

'सांगितलंय् बायकांना.'

'मोबिलायझेशन कुणी केलं?'

'थोडं आम्ही केलं. थोडं एस्. एफ्. आय्. च्या पोरांनी केलं. फॅक्टरीवर जाऊन त्यांनी गेट-मीटिंगा घेतल्या.'

'बायकांना मीटिंगची कल्पना दिलीय् ना?'

'हो सांगितलंय् त्यांना त्यांचे प्रॉब्लेम सांगायला.'

'मीटिंग इन-डोअर घ्यायची, की आऊट-डोअर?'

'आम्हांला वाटतं, आधी इन-डोअर घ्यावी. नंतर मोर्च्यानं बाहेर पडून बायकांना सभेत नेऊन बसवायचं. आज ८ मार्चला बायकांचा मोर्चा झालाच पाहिजे.'

'आणखी कोण-कोण येणार आहेत?'

'पार्टीचे लोक येतील. शिवाय डी. वाय्. एफ्. आय्. चे आहेतच.'

'बायका हुशार झाल्या. चांगलं प्लॅनिंग करायला लागल्या.'

–बोलणाऱ्यांच्या भाषेत ग्रामीण बोलीचे हेल होते. पण इंग्रजी शब्दांचं प्रमाण थक्क करणारं होतं.

'विंग'मध्ये कम्युनिस्ट पार्टीचं काम आहे. या छोट्याशा गावात जनवादी महिला संघटना, SFI (स्टूडंटस् फेडरेशन ऑफ इंडिया) आणि DYFI (डिस्ट्रिक्ट युथ फेडरेशन ऑफ इंडिया) अशा पार्टीच्या तीन जनसंघटना आहेत.

संयोजक असलेला प्रमुख कार्यकर्ता कऱ्हाडला बँकेत नोकरी करतो. त्याची बायको कऱ्हाडला प्राथमिक शाळेत शिकवते. आई जनवादी महिला संघटनेची अध्यक्ष आहे. जेमतेम अक्षरओळख असलेली, मध्यम वयाची ही तरतरीत बाई वरील संवादात असेच शब्द वापरून सहजपणे भाग घेत होती. इतर दोन संघटनांतली मुलं कॉलेजमध्ये जाणारी, शाळा अर्धवट सोडून शेती किंवा गावात उपलब्ध असलेले व्यवसाय करणारी होती. त्यांच्याबरोबर निवडणुका, राजकारण अशा विषयांवर चर्चा सुरू झाली. लक्षात आलं, की 'डीक्लास होणं', 'फ्यूडल विचार', 'कॅपिटॅलिस्ट सोसायटी', 'मिडल क्लास टेंडन्सी', 'पोलरायझेशन', इत्यादी साम्यवादी विचारव्यूहातील संकल्पना इंग्रजी शब्द वापरून मातृभाषा बोलावी, इतक्या सहजतेनं ती मांडताहेत.

बेसिल बर्नस्टाईन या अभ्यासकानं भाषेबद्दल Restricted Code (मर्यादित भाषाव्यवहार) आणि Elaborated code (विस्तारित भाषाव्यवहार) अशा दोन संकल्पना मांडल्या आहेत. Restricted code मध्ये त्या त्या बोलीचं विशुद्ध रूप टिकून राहिलेलं असतं. कारण मूलभूत शब्द वापरून दैनंदिन गरजा भागवणं हे restricted code चं कार्य असतं. बाह्य जगाशी वेगवेगळ्या पातळ्यांवर संपर्क साधताना अधिक व्यापक झालेले भाषाव्यवहार Elaloorated code मध्ये समाविष्ट होतात.

विंगमधल्या कार्यकर्त्यांची माझ्याशी बोलण्याची भाषा Elaborated code आहे. त्यांचे सीनिअर कार्यकर्ते आणि नेते याच भाषेत त्यांच्याशी राजकीय आणि सामाजिक विचारांची देवाणघेवाण करतात आणि जनसंघटना बांधतात. साम्यवादी विचारव्यूहाशी, जनसंघटन पद्धतीशी विंगमधल्या कार्यकर्त्यांची पहिली ओळख इंग्रजी शब्दांच्या आधारानंच झाली. त्यांचं राजकीय-सामाजिक विचारशिक्षण याच भाषेतून झालं. त्यामुळं त्यांच्या दृष्टीनं

हे इंग्रजी शब्द आता मातृभाषेतले शब्द असल्यासारखेच झाले आहेत. खरं तर हे शब्द नाहीतच, समाज बदलण्याच्या प्रक्रियेची ती चिन्हं आहेत. समाजपरिवर्तनाच्या संदर्भात यापेक्षा वेगळं मराठी हे कार्यकर्ते बोलू शकणार नाहीत. मग इंग्रजी शब्द नकोत, म्हणून त्यांच्या राजकीय भाषेतील हे शब्द हट्टानं बदलण्याचा प्रयत्न करायचा का ? त्यांच्या तो वळणी पडेल का ?

दुसरा प्रश्न असा, की बाह्य-प्रभाव इतके तीव्र असताना त्यांच्या restricted code चं स्वरूप किती विशुद्ध राहिलं असणार ? अभ्यास करायला पाहिजे.

समाज-भाषाविज्ञानातील महत्त्वाचे सिद्धांत भाषाभ्यासकांनी भारतीय भाषांचा अभ्यास करून मांडलेले आहेत. चार भाषाकुलं आणि त्यांच्या परस्पर–संपर्कातून तयार झालेल्या असंख्य मिश्र भाषा हे भारताचं ' भाषिक वास्तव ' आहे. शिवाय धार्मिक, जातीय, आर्थिक, सामाजिक आणि व्यावसायिक भेद आहेतच. भाषाभ्यासकांना भारत हा ' लिंग्विस्टिक एरिया ' ( भाषिक क्षेत्र ) वाटत आलेली आहे.

विंगमधल्या भाषाव्यवहारानं ही आठवण पुन्हा जागी केली.

**अंजली सोमण**

**एक प्राचीन विनोदी चुटका**

एका हत्तीच्या पाठीवर एक डास जाऊन उतरला.

पुन्हा उड्डाण करायच्या तयारीत असताना त्याने हत्तीला आगाऊ सावधगिरीची सूचना दिली हत्ती उगीच डगमगायला नको म्हणून–

हत्ती म्हणाला,

' आपण उगीच त्रास घेतलात. आपण पाठीवर उतरलात, त्याचाही मला पत्ता लागला नाही, आणि उडालात, तरी मला कळणार नाही ! '

बाबिलोनच्या उत्खननात एका खापरावर मिळालेला मजकूर.

( हा सगळ्यात प्राचीन उपलब्ध विनोदी चुटका आहे. )

# मध्यप्रदेशातील मराठी भाषा

गीता सप्रे

[ परप्रांतात मराठी कसं बोललं जातं, याकडे खेळीमेळीने आणि खूप निरीक्षण करून लिहिलेला हा लेख आहे. मध्यप्रदेशातील अनेक वर्षांच्या वास्तव्यानंतर लेखिका आता कलकत्त्याला गेली आहे. तेव्हा तिच्याकडून 'बंगाली' मराठीवरही नंतर कधीतरी वाचायला मिळू शकेल, अशी अपेक्षा बाळगू या. यातील मते सर्वसामान्य भाषकाची आहेत. भाषावैज्ञानिकाची नाहीत, याची नोंद घ्यावी. —संपादक ]

मनातले विचार व्यक्त करण्याचं एक साधन, या उद्दिष्टानं भाषा निर्माण झाली. कोणत्याही भाषेचा मुख्य उद्देश तोच असतो. कितीही वेगवेगळ्या भाषांचे मिश्रित शब्द उपयोगात आणून का होईना, पण समोरच्या व्यक्तीला समजेल, अशा शब्दांत आपले विचार व्यक्त करता आले, की भाषेचा उद्देश पूर्ण होतो. पण जेव्हा आपण एका विशिष्ट भाषेचा विचार करतो, तेव्हा त्या संदर्भात ती ती बोलीभाषा कितपत शुद्ध किंवा अशुद्ध बोलली जाते, याचा विचार करायला हवा.

या उद्देशानं मध्यप्रदेशीय मराठी भाषेचा आढावा घेतला, तर आपल्याला असं आढळून येईल, की मध्यप्रदेशाची मराठी बोलीभाषा अत्यंत बिघडलेली आहे. मध्यप्रदेशीय मराठी भाषेला महाराष्ट्रातले लोक 'खिचडी भाषा' म्हणून हसतात, नावं ठेवतात. जर शुद्ध भाषा हाचा निकष लावायचा, असं ठरवलं, तर मध्यप्रदेशातल्या कोणत्याच व्यक्तीची भाषा शुद्ध नसते, हे कबूल. मध्यप्रदेशीय मराठी माणूस 'आम्ही जाऊन राह्यलोय्', 'करून राह्यलोय्', टाईप हिंदी वळणाचं मराठी बोलतो. पण कहर म्हणजे, अगदी नव्या पिढीला मराठी भाषा फारशी येतच नाही. आजकालच्या तरुण मुलांमुलींचं बोलणं ऐकलं, तर ती भयंकर भाषा ऐकून पुणेरी लोकांना मूर्च्छा येईल.

जबलपूरला असताना आमच्या समोर राहणाऱ्या दीप्तीला मी म्हटलं,

"ये ना एकदा आमच्याकडे."

त्यावर ती हसून म्हणाली,

"मावशी, मी **सोचतच होते** तुझ्याकडे येण्याचं." ( **विचार करतच** होते ).

असंच एकदा शेजारची छोटी पिंकी धावत आली अन् म्हणाली,

"काकू, देखो ना पेड़वरती किती ढेर सारे तोते बसलेत."

एकदा माझी पुतणी वय वर्षे आठ रडत होती. मी विचारलं,

"मधुरा, काय झालं, ग ! का रडतेस !"

रडत रडत ती म्हणाली,

" बाबा, मला पिटतील नं ! "

" का मारतील ? "

" बाबांनी मला हा लेसन लर्न करून ठेवायला सांगितला होता; पण मी काय करू ? मला यादच होत नाहीये. "

एखादा अठरा–एकोणीस वर्षांचा मुलगा वाटेत भेटला अन् त्याला विचारलं,

" का रे विकास, इकडे कुणीकडे ? "

तर उत्तर मिळेल,

" मी आपल्या दोस्ताकडे पुस्तक वापस करायला गेलो होतो. "

वरताण म्हणजे, पुस्तकांचं अनेकवचन ' पुस्तकं ' असं न करता आजकालची मुलं ' पुस्तका ' असं म्हणतात.

" पुस्तका आणायच्या आहेत नं, बाबा, पैसे द्या ! " असं म्हणतील.

गहू दळवायला निघालेल्या प्रवीणला पण ' कुठं जातोय् ? ' म्हणून विचारा. तो सांगेल,

" आटा अन् बेसन चक्कीवरून पिसऊन आणायला चाललोय्. "

अर्थात तरुण पिढीच फक्त इतकं भयंकर मराठी बोलतेय्, असं नव्हे, तर जुन्या पिढीची परिस्थिती पण तितकीच चिंतनीय आहे. बऱ्याच स्त्रियांच्या तोंडून, ' कचरा घूऱ्यावर फेकून दे ', ' आटा खतम झालाय् ' किंवा ' बेसन दळवायचंय् ' असे शब्दप्रयोग सहज ऐकू येतील. आपल्या बोलण्यात काहीतरी चुकतंय्, याची त्यांना जाणीव पण नाही, इतके हे हिंदी शब्द तोंडात फिट्ट बसलेत. आस्याकरता ' कणीक ' हा मराठी शब्द निदान या बायकांना माहीत आहे– फक्त चुकीनं वा सवयीनं त्या ' आटा ' हा शब्द वापरतात. पण बेसनाला मराठीत ' चण्याच्या डाळीचं पीठ ' म्हणतात, हे तर अधिकांश बायकांना माहीत पण नसतं.

पुरुषांच्या तोंडची मराठी भाषा ऐकली, तर स्त्रियांची भाषा बरी होती, असं म्हणायची पाळी येते. एखादा नवरा सहज बोलताना, ' का, ग ! ह्या लोट्याला जंग कसा लागला ? ' असा प्रश्न विचारतो, तेव्हा काहीतरी चुकतंय्, असं त्याच्या लक्षात देखील येत नाही.

सर्वसामान्य पुरुषच नव्हे, तर स्टेजवरून बोलताना एखादा मान्यवर वक्तासुद्धा, ' आपण मला बोलायचा मौका दिला, त्याबद्दल मी आपला आभारी आहे ' असं बिन-दिक्कत बोलून जातो. अन् वक्ता जर एखादा वीस-बावीस वर्षांचा सुनील असेल, तर विचारायलाच नको. तो तर, ' आपण मला बोलायचा मौका दिला, याबद्दल मी आपला कृतग्य ( कृतज्ञ ) आहे ', असं म्हणेल.

तर हे झाले जबलपुरी मराठी भाषेचे नमुने.

ग्वाल्हेरची परिस्थिती तर याहूनही अधिक वाईट आहे. ग्वाल्हेरला एखाद्या मराठी

माणसाला तुम्ही एखादा पत्ता विचारा, तो तुम्हांला सांगेल,

" अशेच सीधे जा अन् मग नुक्कडवर डाव्या गल्लीत मुरकून जा. "

ग्वाल्हेरला ' भैय्या ' हा शब्द बोलताना खूप वापरतात. ' आम्ही तर भैय्या, असं केलं ' अन् ' आमचं तर भैय्या तसं आहे ' असा सतत ' भैय्या ' सोबतीला असतोच.

अगदी परवाचीच गोष्ट आहे. आमच्याकडे ग्वाल्हेरचे एक सद्गृहस्थ आले होते. आजकाल ते दिल्लीला ' सॅटल ' झालेत. ते बोलता बोलता म्हणाले,

" अरे ! दुनियाभरात ग्वाल्हेरी माणूस कुठेई असो, तुम्ही त्याला ' शकल 'नी ओळखू शकता. "

ग्वाल्हेरच्या मराठी भाषेवर हिंदी व उर्दू भाषेचा खूपच प्रभाव आहे. ' हजूर ','जनाब', ' बजा फर्माया ', ' बढिया ' असे शब्द तोंडात अगदी सहज रुळलेले आहेत.

ग्वाल्हेरच्या जुन्या सरदार घराण्यातले लोक तर मराठी म्हणून जी काय भव्यदिव्य भाषा बोलतात, तिचा एक नमुना ' पेश-ए-खिदमद ' आहे :

" मांसाबांचा हुकूम होता, रातच्या टेम होता. आमि च्याललो होतो. आसमानमधी तारे अशे च्यमच्यम च्यमकत होते– जशे बिजलीचे लट्टूच. अंधेरा असा छायला होता, की आमाला काय बी दिसत नव्हतं. एका पत्थराला टकरावून आमि अशे गडगडलो, की बडी बुरी ठेंच लागली. बहुत खून निघालं. मग आमि पट्टीबिट्टी बांधली जखमेवर अन् धीरे धीरे घरी वापस आलो. आमाला हून गेली देरी. तं मांसाबांनी फिकर करण्याऐवजी खूप डांट पिलवली. आमची तर जबानच बंद हून गेली. "

आता थोडा सागरचा फेरफटका मारू या.

सागरला मी नणंदेकडे गेले होते. एका मैत्रिणीकडे भेटायला जायचं होतं. पण मला तिचं घर माहीत नव्हतं. म्हणून माझा भाचा प्रदीप वय वर्षे दहा सोबत आला. वाटेत मी त्याला विचारलं,

" प्रदीप ! तुला शकूमावशीचं घर माहीत आहे नं ? "

सागरचे लोक एक विशिष्ट प्रकारचा हेल काढून बोलतात. त्या विशिष्ट सगरियाऊ टोनमधे तो मला म्हणाला,

" ए माऽऽमी ! तू फिकऽर नको करू. मी तुला सागरची कुलियन कुलियन ( गल्ली न् गल्ली ) घुमऊन देईन. "

शकू घरी नव्हती. ' आई कुठं गेलीये ' म्हणून मी तिच्या मुलाला विचारलं, तर त्यानं सांगितलं,

" आई जरा भटकायला गेलीये. येण्यातच असेल. "

नणंदेच्या शेजारच्या आजी नातवाचं कौतुक सांगत होत्या :

" अस्सा जिद्दीये. आमि अम्मळ टेकलो नई, कि आमाला परेशान करायला येऊन

जातो. बरं, एक काम करा आमचं. अटरियावर एक पुटरिया ठेवलीये नं, ती काढून द्या. "

—अन् मग अटरियावरल्या त्या पुटरियातून एक छानसा जरीचा खण काढून त्यांनी मला दिला.

संध्याकाळी सागरच्या सुप्रसिद्ध तलावावर बोटिंग करायला निघालो, तर घरातल्या काकांनी सांगितलं,

" उगीच ज्यास्त देरी नका करू. टाईमवर घरी वापस या हं. "

दुसरे एक भैय्यामामा आपल्या धाकट्या मुलाबद्दल चिडून सांगत होते :

" संदीपके बारेमें तो बोलनाही बेकार है. पढ़ाई-बिढाई मधे त्याचं ध्यान थोडीच आहे ! नुसतं गावभर भटकायला सांगून द्या. "

एकदा मी श्री. प्रभाकर माचवे यांच्याकडे गेले होते. तेव्हा गप्पांच्या ओघात त्यांनी ही सगरिआऊ गंमत सांगितली. —

श्री. माचवे सागरला एका लग्नसमारंभाला गेले होते. घरातले आजोबा उकिडवे बसून पानावर चुना लावता लावता नातवाला म्हणाले

" आजीला जाऊन सांग, कि दुनिया भरभरून द्या, म्हणावं. "

विश्व भरभरून काय दिलं जाऊ शकतं, याचं आश्चर्य श्री. माचवे यांना वाटत होतं. ते काहीशा बुचकळ्यात पडले होते. पण तेवढ्यात मुरमुऱ्यांचा चिवडा भरभरून द्रोण ठेवलेलं ताट समोर आलं अन् दुनिया म्हणजे द्रोण, हा उलगडा झाला.

इंदोरचा मराठी माणूस इंदोरला दुसरं पुणं समजतो व आपण शुद्ध मराठी भाषा बोलतो, असा त्यांचा उगीचच गैरसमज आहे. इंदोरची मराठी भाषा मध्यप्रदेशातल्या इतर शहरांच्या तुलनेत जरा कमी बिघडलेली आहे, हे कबूल; निदान आठ-दहा वर्षांपूर्वी तरी तसं जाणवायचं. पण तेव्हा देखील तिथे 'दौडत दौडत जा, नाहीतर तो निघून जाईल,' 'तिनी जूडा किती छान घातलाय्,' 'तो चाहील, तर एडमिशन मिळू शकेल'— अशी भाषा सात-आठ वर्षांपूर्वी पण ऐकायला मिळायची. इंदोरच्या मराठी भाषेवर माळवी भाषेचा, विशेषतः टोन, खूप प्रभाव आहे व मराठी लोक बोलताना माळवी पद्धतीनं 'नि' 'नि' असं मधे मधे वापरतात,

आता तर काय, इंदोरची मराठी भाषा पण खूप बिघडली आहे. 'तो एम्. वाय्. हॉस्पिटलमधे बीमार पडलाय्, म्हणून त्याची तबियत बघायला चाललोय्' असं इतकं अशुद्ध वाक्य आजकाल तिथं सहज ऐकू येतं व नवीन पिढी तर जवाब नहीं ! 'मला सोनालीला मिळायची ( भेटायची. ) खूप इच्छा आहे.' हिंदी वाक्य 'सोनालीसे मिलनेकी इच्छा है' चं मराठीकरण. 'पेन्सिल छिलून दे,' 'तू मला पकड. नाहीतर मी गिरून जाईन'— हे असलं भयंकर मराठी आता लहान मुलाच्या तोंडून इंदोरला पण ऐकायला मिळतं.

ग्वाल्हेरला भाज्यांकरता– लौकी ( दुधी भोपळा ), करमकल्ला ( कोबी ), सूआ ( शेपूची भाजी ), वगैरे तर इंदोरला– आल ( दुधी ), कोला (लाल भोपळा ) बटला ( मटार ), बरबटी ( चवळीच्या शेंगा ), छोड ( हिरवे चणे )– असे शब्द सर्रास उपयोगात येतात.

रायपूर, बिलासपूरच्या मराठी भाषेवर छत्तिसगडी भाषेचा प्रभाव आहे, तर सागर दमोहच्या बाजूला बुंदेली भाषेचा. मध्यप्रदेशची राजधानी भोपाळ इथं इंदोर, ग्वाल्हेर, सागर, जबलपूर, रायपूर, बिलासपूर वगैरे सगळीकडचे लोक राहतात व ते आपापल्या पद्धतीनं मराठी भाषा बोलतात. भोपाळची म्हणून काही खास अशी भाषा जाणवली नाही. भोपाळची हिंदी भाषा मात्र एका खास भोपाली टोनमधे बोलली जाते. शब्द देखील हिंदी कमी, उर्दू जास्त. 'शोले' सिनेमातला जगदीप ' सूरमा भोपाली ' तीच भाषा बोलतो.

मध्यप्रदेशाची बोली भाषा तरी बरी; पण लिहिताना तर मराठीचे अक्षरशः तीन तेरा वाजतात.

उदाहरणार्थ, काही निम्नलिखित वाक्यं वाचा :

१. तेन्ला सांगून दे. २. हे तुला कडलं, ( कळलं ), कि नाही ? ३. मला भूख नव्हती. ४. तीला ध्यून ते मद्रासला गेले. ५. तुम्ही या लग्नात उपस्थित असता तर आमच्या आनंदाला वाढ मिळाली असती. ६. आमि आपल्या सर्मथ्याहून ज्यास्त करायचा प्रयतन करू. ७. बोलायला ढेर ढेर सारं आहे. पण पत्रात कशी लिहू ! ८. माला, तुझी खूब याद येते. ९. माझी शाला शुरू झाली. १०. तुला कडौलं कि नाही त्यांनी ? वगैरे वगैरे.

म्हणजे लिहिणं तर फारच अशुद्ध. तसे आजकालची मुलंमुली सरळ हिंदीत किंवा इंग्रजीतच पत्रं लिहितात. मराठीत लिहीतच नाहीत. ( मराठी लिहिण्याच्या फंदातच पडत नाहीत– मध्यप्रदेशीय वाक्य ).

इथे एक गोष्ट मुद्दाम नमूद करायला हवी. वर दिलेली सर्व उदाहरणं म्हणजे एक सर-सकट विधान आहे.

अशुद्धच काय, पण ज्यांना अजिबात मराठी बोलता येत नाही, अशीसुद्धा काही मराठी माणसं इथं आहेत. त्याचप्रमाणे नव्वद टक्के शुद्ध मराठी बोलू शकणारे पण काही महाराष्ट्रीयन इथं आहेत. अगदीच नाही, असं नाही.

मध्यप्रदेशीय मराठी भाषेला गमतीनं बरेच जण ' खिचडी भाषा ' असं म्हणतात. पण खरं सांगू , खिचडीत जसं डाळ, तांदूळ, आलं, लसूण - म्हणजे जे काय मिश्रण करायचं असेल, ते छान मिळून आलं, की मगच खिचडीची आगळीवेगळी अशी चव येते. तद्वत– इथं सर्व भाषांचं मिश्रण होऊन येथली ही खिचडी भाषा अशी छान मिळून आलीये, की महाराष्ट्रातल्या बऱ्याच लोकांना या भाषेबद्दल एक खास आकर्षण वाटतं.

श्रीमती आशा मुंडले एकदा मला म्हणाल्या,

" मला आवडते मध्यप्रदेशीय मराठी. एक वेगळाच गोडवा आहे या भाषेला."

साहित्यिक दृष्टीनं मूल्यमापन केलं तर शुद्ध मराठीपुढं मध्यप्रदेशातल्या मराठी साहित्यिकाची मराठी भाषादेखील काहीशी अशुद्धच वाटेल. बाकी सर्वसामान्य माणसाची भाषा तर किती दिव्य आहे हे, आपण सोदाहरण पाहिलंच. खरं तर, माझा हा लेख हाही प्रत्यक्ष उदाहरण आहेच म्हणा!

मध्यप्रदेशातल्या लोकांना दोष देणं, त्यांच्या भाषेला हसणं, हेटाळणी करणं सोपं आहे. पण प्रत्यक्षात इथं येऊन फार नाही, फक्त दोन–तीन वर्षं राहा, तुमच्या भाषेची पार खिचडी नाही झाली, तरच आश्चर्य!

उदाहरणार्थ, माझी एक भावजय नवीन लग्न होऊन आली, तेव्हा ती शुद्ध अन् मुख्य म्हणजे पुणेरी ठसकेबाज मराठी बोलत असे. पण आता! आता परवाच मला भेटली, तर म्हणत होती,

" काल गमलेवाला (कुंड्या विकणारा) आला होता. पण मला नाही आवडले. आमच्या पुण्याला इतके बढियां गमले मिळतात. पण पौधे मात्र छान छान होते हं त्याच्याजवळ."

तिला दोष देण्यात अर्थ नाही. तिची चूक नाहीच. कारण इथं एकदा घराबाहेर पडलं, की सर्वत्र हिंदी भाषेतच व्यवहार चालतात. अन् अगदी खरं सांगायचं, तर अधिकांश घरांतून सर्रास हिंदी भाषा बोलली जाते. चाळिशीच्या वरचे लोक, थोडीशी अशुद्ध झालेली का असेना, पण निदान घरात तरी मराठी भाषाच बोलतात. पण नवीन पिढीचं मात्र कठीण आहे. त्यांना मराठी फक्त समजते अन् तीही सोपी सरळ असली, तरच. क्लिष्ट असली, तर चटकन् समजत नाही.

येथील माणसं आपली मातृभाषा विसरून किती पटकन् हिंदी बोलू लागतात, याचं एक उदाहरण देते. इंदोरच्या महाराष्ट्र साहित्य सभेत एकदा बृहन्महाराष्ट्र परिषदेचे सचिव आले होते. मीटिंगमधे– मध्यप्रदेशात मराठी भाषा कशी टिकवून ठेवायला हवी, आमची भाषा आचार विचार, संस्कृतीविषयी कसा जाज्वल्य अभिमान बाळगायला हवा, वगैरे चर्चा चालली होती. बोलता बोलता अनवधानानं बरेच सभासद कसे हिंदीत बोलू लागले, हे आधी कळलंच नाही. जेव्हा सचिवांच्या लक्षात ही गोष्ट आली, तेव्हा ते म्हणाले,

" अजी, ये क्या चल रहा है! कमसे कम इस मीटिंगमें तो हमने मराठी बोलनी चाहिये."

यावर कोणीतरी हसून सचिवांना म्हटलं,

" निदान हे वाक्य तरी तुम्ही मराठीत बोलायला हवं होतं."

– अन् मीटिंगमधला गंभीरपणा हास्यकल्लोळात वितळून गेला.

अर्थात मध्यप्रदेशीय मराठी भाषेलाच हसायला नको हं. कारण महाराष्ट्रापासून दूर





अनुक्रमणिका

कुठेही राहा, आपल्या भाषेवर त्या त्या भाषेचा प्रभाव होणं साहजिकच आहे.

माझी दिल्लीला राहणारी पुतणी पंजाबी टोनमधे, पंजाबी उच्चारात मराठी बोलते.

" आई, मी आज काय डालू ? (म्हणजे काय घालू ?) फ्रॉक, की सलवार सूट ?" किंवा

" आई ! आज तू ती ऑरगेन्झा डाल नं ! तुला ती खूप खिलते. "

तसंच ' आज जेवायला काय बनवू ? ' म्हणून आईनं विचारलं, की स्वप्निल सांगतो,

" आई ! आज आलू, भिंडी, मांकी दाल अन् परोठे. "

आपण भेंडीची भाजी, बटाट्याची भाजी असं म्हणतो; पण पंजाबी लोक ' आज भिंडी बनाई है, आलू बनाये हैं ' असं म्हणतात. ' मां की दाल ' म्हणजे उडदाचं वरण.

स्कॉटलंडला राहणारी माझी नऊ वर्षीय पुतणी यावर्षी नवरात्रात आली होती. तिच्या मराठी भाषेत इतर भाषेचं मिश्रण नव्हतं. पण उच्चारण एकदम साहेबी.

' म्हॉला पॅट्टाळ भाजी व्हाढ. ' ' म्हॉला ख्वरंजी आवडते. ' ( ड 'चा उच्चार ' ड अन् ' र ' च्या मधलं काहीतरी ). एकदा कारमधे ती सीटवर न बसता खाली बसली. मी म्हटलं,

" खाली का बसलीयेस ? सीटवर बस नं ! " तर ती म्हणाली, " स्सीट घरम झालीये म्हाजं ढुंगण पोरलं. " ( पोळलं )

एकदा मी झाशीला गेले होते. दूर कल्हईवाल्याचा आवाज ऐकून गृहलक्ष्मीनं आपल्या मुलाला, ' जा कल्हईवाल्याला बुलऊन आण ' म्हणून आज्ञा केली. मुलानं थोड्या वेळानं येऊन सांगितलं,

" मी त्याच्या पीछे पीछे खूब दूर गेलो. पण तो कुठे घुसून गेला, पत्ताच नाही लागला. कुठंतरी गल्लीत गायब झाला. "

एकदा आग्र्याला गेले होते. दोघां मुलांचं भांडण चाललं होतं. मोठा संतापानं ओरडून म्हणाला,

" माझा माथा नको भडकवू. ज्यास्त गुस्सा दिलवला नं, तर मी एक झापड लगऊन देईने. "

अलाहाबादचा मुलगा हेच वाक्य म्हणताना, ' एक लप्पड रसीद करेन ना, तेव्हां अकल येईल तुझी ठिकाण्यावर '— असं म्हणेल. छिंदवाडा शिवनी वगैरेकडे दुपारच्या वेळी एखाद्या गृहलक्ष्मीला विचारा,

' काय दुपारची वामकुक्षी ! '

तर उत्तर मिळेल,

' नाही, अशीच जरा लेटले होते. ' असो.

उदाहरणं तर अनेक देता येतील. पण मध्यप्रदेशीय मराठी भाषा बिघडण्याचं कारण काय, हे पाहायला हवं !

येथील मराठी भाषा इतकी बिघडण्याचं काय कारण असावं, याचा गंभीरतेनं विचार

केला, तर आढळून येतं, की–

१ ) आता इथं मराठी माध्यमातून शिक्षण मिळण्याची अजिबात सोय नाही.

अर्थात आता तशी सोय करूनही कितपत उपयोग होईल, शंकाच आहे ! कारण मराठी माध्यमातून शिक्षण घेण्यास आजकाल कोणीच इच्छुक नसतात. कारण एकच. त्यांचं म्हणणं असतं की,

" काय फायदा ! त्यापेक्षा हिंदी किंवा इंग्रजी माध्यमातून शिक्षण घेतलं, तर नोकरी किंवा करियरच्या दृष्टीनं सोईस्कर राहतं. "

२ ) मराठी साहित्य वाचायला मिळत नाही.

मध्यप्रदेशात मराठी साहित्य कितपत वाचलं जातं ? किती मराठी मुलं मराठी शिकतात ? नवीन पिढीला किती मराठी लेखक– निदान नावानं तरी– माहीत आहेत ? मराठी मासिकं किती घरांमध्ये येतात !— या दृष्टिकोणातून जर सर्वेक्षण केलं, आढावा घेतला, तर भयंकर निराशा पदरी पडेल, अशी परिस्थिती आहे.

मराठी मासिकं, वर्तमानपत्रं क्वचितच घरातून विकत घेतली जातात. जे लोक घेतात, ते फार फार तर एखादंच मासिक किंवा एखादंच वर्तमानपत्र घेऊ शकतात. मराठी मासिकं, वर्तमानपत्रं सहजा-सहजी मिळत नाहीत. वर्तमानपत्र सहसा आजचं उद्याला मिळतं. मासिकंसुद्धा खूप उशिरानं मिळतात. पोस्टात गहाळ होतात.

मराठी वाचनाची आवड असणाऱ्या मूठभर लोकांना वाचनालयाकडे धाव घ्यावी लागते. एक एक मराठी वाचनालय, साधारणपणे प्रत्येक शहरात आहे. पण वाचनाला– यांची परिस्थिती फारच चिंताजनक असते. सर्वसामान्य वाचकांना नवीन किंवा हवी ती पुस्तकं सहसा मिळत नाहीत.

प्रत्येक शहरात निदान एक ते दोन ( दोन म्हणजे खूप झालेत ) ' घरपोच वाचनालय '– वाले असतात. ते मासिकं आठवड्यातून एकदा किंवा दोनदा आणतात. दिवाळी अंक वाचायला मिळतील, या आशेनं अशा घरपोच वाचनालयांची सदस्यता मराठीप्रेमी घेतात. पण आठ-दहा दिवाळी अंक वाचून झाले, की हे सद्गृहस्थ दिसेनासे होतात– असा अनेकजणांचा न् माझा पण अनुभव आहे, थोडक्यात सांगायचं, तर मध्यप्रदेशीय सर्वसामान्य मराठी वाचक– अन् मराठी साहित्य– यांच्यामध्ये एक खूप मोठी दरी पसरलेली आहे.

महाराष्ट्रातले दोन सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. पु. ल. देशपांडे अन् श्री. व. पु. काळे यांना मात्र तमाम मध्यप्रदेशीय मराठी जनता ओळखते. ' श्राव्य ' माध्यमातून कॅसेटस्‌मुळे. अर्थात याचं थोडंसं श्रेय श्री. अळूरकरांना जातं.

मराठी चित्रपट, मराठी कार्यक्रम, मराठी नाटकं पाहायला मिळत नाहीत. वर्षातून क्वचितच एखादा मराठी चित्रपट पाहायला मिळतो. तो पण फक्त रविवारी सकाळचा शो असतो. म्हणजे मुद्दाम ठरवून, वेळ काढून, प्रयत्नपूर्वक जावं लागतं. आधी आरक्षण केलेलं नसेल, तर आयत्या वेळी तिकीट मिळण्याची शक्यता कमीच असते. अन् गेली दोन अडीच

वर्षं सकाळचा वेळ रामायण, महाभारतानं घेतल्यामुळं त्या वेळात चित्रपट पाहायला जाणार कोण! त्यामुळं मागवतच नाहीत.

माझ्या आठवणीत आता या वर्षी राजकमलचा (की सचिनचा म्हणायचं!) 'अशी ही बनवाबनवी' हा चित्रपट इंदोरच्या श्रीकृष्ण टॉकीजमध्ये सतत पंधरा-वीस दिवस (अंदाजे सांगतेय्, कदाचित अधिक चालला असेल) चारही 'शो'मध्ये लागला होता. व मला असं वाटतं, की सर्व शो 'हाऊस फुल' गेलेत. हा एक विक्रमच म्हणावा लागेल.

तशी प्रत्येक शहरात - अगदी इंदोर, भोपाळपासून ते मंडला, रीवा अशा छोट्या शहरांतसुद्धा, महाराष्ट्र मंडळं आहेत व मूठभर मराठी कार्यकर्ते आणखी दोन मूठ मराठी माणसं एकत्र करण्याचा प्रयत्न करत असतात. मराठी स्त्रिया भजनी मंडळं, भगिनी मंडळं, स्थापन करून मराठी संस्कृती टिकवून ठेवण्याचा प्रयत्न करताना दिसतात. पण मध्य-प्रदेशात दूरदर्शन आल्यापासून तर या असल्या संस्थांची संख्या अगदीच रोडावली आहे. हल्ली कोणत्याही मराठी कार्यक्रमात प्रेक्षक गोळा करणं कार्यकर्त्यांना फारच जड जातं.

काही वर्षांपूर्वीपर्यंत ग्वाल्हेरच्या शरद व्याख्यानमालेत जनकगंज शाळेचं भलंमोठं पटांगण श्रोत्यांनी गच्च भरलेलं असायचं. पण आता एखाद्या कार्यक्रमाला तीन-चारशे श्रोते आले, तर 'आज गर्दी होती हं' असं म्हटलं जातं.

तसं प्रत्येक शहरात मराठीप्रेमी लोक मराठीच्या प्रचार-प्रसाराकरता काही ना काही खटपट करत आहेत.

इंदोरची 'महाराष्ट्र साहित्य सभा' ही संस्था मराठी प्रसार व मराठी भाषेची प्रगती करण्याचं काम गेल्या कित्येक वर्षांपासून करत आहे. नवीन पिढीतल्या मराठी मुलामुलींनी मराठी शिकावं, हे उद्दिष्ट समोर ठेवून तिथं मराठीचे वर्ग फुकट चालवतात. मराठीच्या परीक्षा घेतल्या जातात.

व्यवसायाच्या निमित्तानं महाराष्ट्रापासून दूर झालेली मराठी माणसं केवळ मध्यप्रदेशातच नव्हे, तर जगभर पसरलेली आहेत. आपल्या मायभूमीपासून दूर असले, तरी भाषा व संस्कृतीचं संगोपन व संवर्धन नीटपणे व्हावं, त्यांच्यांत एकोपा निर्माण व्हावा वगैरे वगैरे उद्दिष्टांना समोर ठेवून, बृहन्महाराष्ट्र मंडळाची स्थापना झाली. मराठी भाषा आणि संस्कृतीचा प्रसार आणि प्रगती करण्याचं कार्य महाराष्ट्र राज्यातर्फेही केलं जातं व हे प्रयत्न, हे कार्य निश्चितच स्तुत्य आहे. पण हे प्रयत्न पुरेसे आहेत का! उद्दिष्टं कितपत साध्य झाली आहेत, याचा देखील आढावा घ्यायला हवा.

**9 B, Regent Tower, 121/1 N. S. C. Road, Calcutta 700040
W. B.**





अनुक्रमणिका

# आत्याबाईंच्या मिशा

माधव ना. आचार्य

कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा 'यांत्रिक चमत्कार' नावाचा एक विनोदी निबंध आहे. त्यामध्ये 'यांत्रिक काव्या'ची गंमत सांगताना त्यांनी 'आत्या' या शब्दाचा 'मिशा' असा अर्थ दिला आहे. हा अर्थ कसा निष्पन्न झाला? कोल्हटकर लिहितात,

"आत्याबाईला मिशा असत्या, तर तिला काका म्हटले असते-या वाक्यात आत्याबाईच्या मिशा संकेतार्थात होत्या, त्या येथे कवीने स्वार्थात आणल्या आहेत."

मराठी व्याकरणग्रंथांतील '**कर्मकर्तरी**' नामक प्रयोगाची चर्चा वाचताना कोल्हटकरांच्या या वाक्याची नेहमी आठवण येते.

या कर्मकर्तरीला अर्जुनवाडकरांनी 'मराठी प्रयोगांतील **नरसिंहावतार**' म्हटले आहे. (म. सा. पत्रिका क्र. १६७ पृ. ३)

हा प्रयोगप्रकार प्रथम दादोबांनी सांगितला. ते म्हणतात,

'जेव्हा या भाषेत काही प्रसंगी सकर्मक धातूवरून सहाय क्रियापदाचे योगाने अथवा दुसऱ्या प्रकारे अर्थांतर न करिता कर्मास कर्ता करण्याचे अगत्य पडते आणि अशा झालेल्या कर्तृपदाचा अधिकार क्रियापदाचे रूपांवर असतो, तेव्हा एक नवा कर्मकर्तरी म्हणून प्रयोग होतो.' (दादोबा कलम ४२८)

दादोबांचे हे लक्षण समजावून घेण्यासाठी आपण मराठी व्याकरणग्रंथांतीलच या संदर्भातील दोन बहुचर्चित वाक्ये घेऊ:

(अ) १ शिपाई चोर धरतो.
२ शिपायाकडून चोर धरला जातो.

वाक्य क्र. १ मध्ये → शिपाई– कर्ता, चोर– कर्म,
प्रयोग सकर्मक कर्तरी.

क्र. २ हे अर्थान्तर न होता आलेले वाक्य आहे. येथे 'धरला जातो'– हे तथाकथित संयुक्त क्रियापद. दादोबांच्या मते येथे क्र. १ मध्ये कर्मस्थानी असणारा 'चोर' हा शब्द कर्तृस्थानी आला आहे. म्हणून हा कर्मकर्तरी प्रयोग.

दामल्यांनी येथील क्र. २ मध्ये '**नवीन कर्मणी**' प्रयोग सांगितला आहे. ते म्हणतात,

'दादोबा या नवीन कर्मणी प्रयोगास कर्मकर्तरी प्रयोग म्हणतात, दादोबांचे हे नाव या प्रयोगास योग्य नसून तो **कर्मणी** प्रयोगाचाच एक प्रकार होय... यातील क्रियापद कर्तरी

म्हणजे कर्तृगामी नसून कर्मणी म्हणजे कर्मगामी असल्यामुळे हा कर्मकर्तरी म्हणजे एक प्रकारचा कर्तरी प्रयोग खास नाही; तर कर्मणी प्रयोगच होय, हे उघड आहे.'

( दामले / ४ पृ. ६२० )

दादोबा व दामले यांच्या मतांमधील हा फरक 'कर्ता' या संकल्पनेशी संबद्ध आहे.

दादोबांनी या संकल्पनेची व्याख्या केली नाही. म्हणूनच दामले म्हणतात,

'क्रियापदाचे रूपावर ज्याचा अधिकार, तो कर्ता, अशी कर्ता शब्दाची दादोबांची व्याख्या येथे दिसते.' ( दामले / ४ पृ. १४०-१४१ )

दामल्यांनी कर्ता ओळखण्याची सर्वसामान्य खूण सांगितली आहे, ती अशी :

'क्रियापदातील धातूचे णार प्रत्ययान्त कृदन्त करून पुढे कोण हे प्रश्नवाचक सर्वनाम ठेवले असता येणारे उत्तर, तो कर्ता.' ( दामले / ४ पृ. १४० )

परंतु ते मानीत असलेल्या संयुक्त क्रियापदाचा कर्ता सांगताना त्यांनी धरसोड केलीच आहे. ते कधी संयुक्त क्रियापदातील मुख्य धातूवरून, तर कधी गौण धातूवरून कर्ता सांगतात. ( दामले / ४ पृ. ५८६ व ६०३ ) येथे त्यांच्या दृष्टीने 'धरला जातो'मध्ये 'धरला' या कृदन्तामधील 'धर' हा धातू मुख्य; 'जातो' हे आख्यातरूप 'जा' या सहायधातूचे, तो गौण. म्हणून मुख्य धातूचा जो कर्ता, तोच संयुक्त क्रियापदाचाही कर्ता. (दामले / ४ पृ. ६१९ )

या दोन्ही मतांमागे जो तर्कदोष दडलेला आहे, तो प्रथम मांडून पाहू.

'शिपायाकडून चोर धरला जातो', हे वाक्य जर 'शिपाई चोर धरतो' असे असते, तर 'चोर' हे कर्म असते; तेच आता कर्ता झाले आहे. —असा दादोबांच्या मनातील सूचित युक्तिवाद आहे.

तर, 'शिपाई चोर धरतो' या वाक्यात 'धर'चा कर्ता शिपाई म्हणून 'शिपायाकडून चोर धरला जातो' या वाक्यातही 'धरला जातो' याचाही कर्ता शिपाईच, असा दामल्यांचा संयुक्त क्रियापद या संकल्पनेवर आधारलेला गृहीत युक्तिवाद आहे.

ही दोन्ही वाक्ये रचनादृष्ट्या वेगळी असली, तरी अर्थदृष्ट्या समान असल्यामुळे एका-वरून दुसऱ्याचा निर्णय करणारे असे हे युक्तिवाद आहेत. व्याकरण हे रूपरचनांचा विचार करणारे शास्त्र आहे, हे प्रमेयच येथे बाधित होते.

तर्कशास्त्री याची गणना कोणत्या तर्कदोषामध्ये करतील, याचा शोध न घेता आपण ह्याला श्रीपाद कृष्णांच्या भाषेत 'आत्याबाईंच्या मिशा' असे गमतीदार नाव देऊ या.

'कर्मकर्तरी'चा हा नरसिंहावतार एवढ्यावरच संपत नाही. एका वेगळ्या चर्चेच्या रूपात अलिकडच्या व्याकरणग्रंथातही हा भेटतो. प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांच्या 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद' ( १९८७ ) या ग्रंथातील कर्मकर्तरीचे विवेचन या संदर्भात लक्षात घेऊ. ते म्हणतात,

"मराठीत कर्मकर्तरी प्रयोग आहे का, याचा शोध केला पाहिजे. संस्कृतात कर्मकर्तरी

सकर्मक धातूंचा होतो; आणि तो अशा परिस्थितीत होतो, की ज्या वेळी कर्तृनिरपेक्षतेने क्रिया घडते, असा अभिप्राय असतो. जसे ' भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यन्ते सर्वसंशयाः । ' अशा प्रयोगांत सर्वसाधारण प्रयोगांतले कर्म कर्तृस्थानी येते. पण क्रियापदाचे रूप मात्र कर्मणीच असते. असा मराठीतील प्रयोग दाखवायचा झाला, तर ' मला हरबरे चावतात ' अशा रचनांकडे संकेत करावा लागेल. अशा आणखी रचना शोधाव्या लागतील. " ( वादप्रवाद पृ. १७० )

अर्जुनवाडकरांनी उल्लेख केला नसला, तरी असाच युक्तिवाद पूर्वी गो. कृ. मोडकांनीही केला आहे. (मराठीचे अंतरंगदर्शन– १९३२ ).

' मला दार उघडते ' असे वाक्य घेऊन ते म्हणतात,

" या वाक्यात उघडणे ही क्रिया. ही क्रिया करणारा कुणीतरी पाहिजे. ' मला ' या रूपाने उघडण्याची शक्ती सांगितली आहे. तो कर्ता नव्हे. म्हणून येथे ' दार ' हे कर्मच कर्ता आहे. म्हणून हा कर्मकर्तरी प्रयोग. " ( मोडक पृ. २३४ )

मोडकांनी ' मला हरबरे चावतात ', ' मला हे जाते ओढत नाही ' –अशी आणखी वाक्येही कर्मकर्तरीची उदाहरणे म्हणून नमूद केली आहेत.

अशा वाक्यांतील क्रियापदांचा विचार करता येथे शक्य क्रियापदांची आठवण येणे शक्य आहे. या संदर्भात कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे विवेचन नोंद करण्याजोगे आहे. ते म्हणतात,

" कधी कधी शक्यत्वार्थक प्रत्ययाचा प्रयोग न करता केवळ अकर्मक क्रियापदांचाच प्रयोग करतात. जसे– ' मला तो धोंडा हालत नाही. ', ' त्याला ते ओझे उचलत नाही. ' इ. कधी कधी सकर्मक धातूंसही अकर्मक करून वर सांगितलेल्या अर्थी प्रयोग होतो. जसे– ' त्यास ती अक्षरे वाचत नाहीत, पण मला वाचतात. ', ' दूरचा मनुष्य मला ओळखत नाही, पण तुला बराच ओळखतो. '

( मराठी व्याकरणावर निबंध. द्वितीयावृत्ती– १९७१. पृ. ११४ )

याचा अर्थ असा, की काही धातूंची मूळ रूपे व शक्य रूपे सारखीच दिसतात. परंतु उपयोगावरून त्यांतील फरक सांगता येतो.

आता येथील चर्चेत पुनःपुन्हा आलेल्या वाक्याकडे वळू या. त्यासाठी असा वाक्यगट घेऊ :

१ मी हरबरे चावतो.
२ मला हरबरे चावतात.

वाक्य क्र. २ मधील ' चावतात ' हे ' चाव ' धातूचे शक्य रूप आहे. म्हणजे ते **' चाववतात '** असे रूप आहे. म्हणून येथे ' हरबरे ' हा कर्ता व तदनुसारी क्रियापदरूप असल्यामुळे हा **अकर्मक कर्तरी** प्रयोग आहे.

संस्कृत रचनेशी समांतरत्व कल्पून अर्जुनवाडकरांनी याला कर्मकर्तरी म्हटले. संस्कृत रचना बाजूला ठेवूनही येथील युक्तिवाद असा मांडता येईल :

" 'मला हरबरे चावतात' हे वाक्य जर 'मी हरबरे चावतो', असे असते, तर 'हरबरे' हा शब्द कर्मस्थानी गेला असता. तो आता कर्तृस्थानी आला, म्हणून हा कर्म-कर्तरी प्रयोग."

म्हणजे या युक्तिवादातही पुन्हा 'आत्याबाईंच्या मिशा' आहेतच.

अर्जुनवाडकरांनी जो संस्कृत रचनेचा हवाला दिला आहे, त्याची थोडी माहिती घेऊन पुढे जाऊ या. संस्कृतमध्ये तीन प्रकारची रचना कर्मणी म्हणून ओळखली जाते :

१. रामेण द्रव्यं दीयते । (कर्मणी)
२. रामेण गम्यते । (भावे)
३. ओदनः पच्यते । (कर्मकर्तरी)

–यांपैकी तिसरा प्रकार अर्जुनवाडकरांना अभिप्रेत आहे. या प्रकारांशी 'हरबरे चावतात, वजन उचलते' यासारख्या रचनांचे समांतरत्व जाणवणे स्वाभाविक आहे. परंतु संस्कृत कर्मणीची एक वेगळी प्रकृती लक्षात घेतली पाहिजे. तेथे क्रियापदाचे रूप मुळातच कर्मणी असते. (मूळ धातू + य + आत्मनेपदी प्रत्यय). त्यामुळे तेथे केवळ क्रियापदाच्या रूपावरूनही वाक्याचा प्रयोग सांगता येतो. तसा प्रकार मराठीत नाही. तेथे एकच रूप दोन्हींकडे येईल. त्यामुळे ते कर्तरी, की कर्मणी, हे संपूर्ण वाक्यावरून ठरते. जसे :

तिला साप चावला. – कर्तरी.
तिने ओठ चावला. – कर्मणी.

म्हणूनच मराठी प्रयोगलक्षण करताना दामल्यांनी कर्ता, कर्म व क्रियापद यांमधील अन्वयाला रास्त महत्त्व दिले आहे. (दामले / ४ पृ. ६०८)

हे अन्वयतत्त्व मराठी प्रयोगव्यवस्थेतील गाभ्याचे तत्त्व आहे. अर्थात हा अन्वय रूप-दृष्ट्या लक्षात घ्यावयाचा असतो. 'प्रथम ताब्यातील क्रियापद ज्याला अनुसरते, तो कर्ता' (अर्जुनवाडकर पृ. १६७) ही कर्ता ओळखण्याची खूणही यावरच अवलंबून आहे. ती लक्षात घेऊनच चर्चास्पद वाक्यांचा निर्णय निरपेक्षपणे केला पाहिजे.

या निरपेक्षतेचा थोडा शोध घेऊ.

प्रथम उपर्युक्त वाक्यगट (अ) कडे वळू.

(अ) १. शिपाई चोर धरतो.

२. शिपायाकडून चोर धरला जातो.

वाक्य क्र. १ मध्ये ' धर ' धातूचा कर्ता– ' शिपाई ' याबद्दल दुमत नाही.

दामले वाक्य क्र. २ मध्येही तोच कर्ता मानतात. हे विवाद्य आहे. ' शिपाई हा येथेही कर्ता होईल; परंतु तो ' धरला ' या कृदंतामधील धातूचा. ' जातो ' या आख्यात–रूपी धातूचा नव्हे. आणि प्रयोग सांगताना महत्त्व आहे, ते आख्यातरूपी धातूला व त्याच्या कर्त्याला.

म्हणजे कृदंतकर्ता व आख्यातकर्ता यांमध्ये विवेक केला पाहिजे. तसा केला, म्हणजे क्र. २ मध्ये ' जातो ' या आख्यातरूपी धातूचा कर्ता ' चोर ' हा येतो. कारण ' जा 'चे प्रथम ताख्याती रूप त्याला अनुसरते. तो येथे प्रथमान्त आहे. म्हणून हा प्रयोग कर्तरी ठरतो.

इत्यर्थ, प्रयोग सांगताना या दोन्ही वाक्यांचा परस्पर निरपेक्षपणे विचार केला पाहिजे. तसा केला, म्हणजे वाक्य क्र. २ मधील प्रयोग हा दादोबा सांगतात, तसा कर्मकर्तरीही होणार नाही; व दामले सांगतात; तसा कर्मणीही होणार नाही.

आता वाक्यगट ( ब ) कडे वळू या.

(ब) १. मी हरबरे चावतो.
२. मला हरबरे चावतात.

वाक्य क्र. १ मध्ये ' चावतो ' हे ' चाव ' धातूचे प्रथम ताख्याती रूप ' मी ' या प्रथमान्त शब्दाला अनुसरते. तोच कर्ता. ' हरबरे ' हे कर्म. प्रयोग - सकर्मक कर्तरी. याबद्दल दुमत नाही.

वाक्य क्र. २ मध्ये ' चाव ( व ) ' हा साधित धातू आहे. त्याचे प्रथम ताख्याती रूप ' हरबरे ' या शब्दाला अनुसरते; म्हणून तो कर्ता. तो प्रथमान्त म्हणून प्रयोग कर्तरी. कर्म नाहीच, म्हणून अकर्मक कर्तरी.

दामल्यांनी शक्य धातू हे ' साधित ' मानले नाहीत. त्यामुळे त्यांनी मूळ धातूचा जो कर्ता, तोच शक्य या साधित प्रकाराचाही मानला आहे. तदनुसार त्यांनी शक्य कर्मणी ( त्याला काम करवते. ) व शक्य भावे (त्याला जाणवते. )– असे प्रयोगप्रकार रुजू केले आहेत.

वस्तुतः, मूळ धातू व साधित धातू यांमध्ये ' कर्ता ' सांगताना विवेक केला पाहिजे. जसे, ' माणसाळ ' या नामसाधित धातूचे व्याकरण पाहताना आपण त्याच्या मूळ ' माणूस' या नामरूपाकडे जात नाही. ' माणसाळ ' हेच अंग मानून त्यापासून बनलेल्या क्रियापद-रूपाचा विचार करतो. तसेच येथे केले पाहिजे. ' चाव ' मूळ धातू वेगळा; ' चाव ( व ) '





अनुक्रमणिका

साधित धातू वेगळा. दोघांचे कर्ते म्हणूनच भिन्न.

त्यामुळेच दामल्यांचे उपर्युक्त प्रयोगप्रकार संभवतच नाहीत.

अर्जुनवाडकरांनी शक्य हे साधित धातू मानले आहेत. परंतु वाक्य क्र. २ चा निर्णय लावताना अकारण वाक्य क्र. १ च्या सापेक्षतेने विचार केला आहे. त्यामुळे त्यांना तेथे कर्मकर्तरीचा संभव जाणवला. वस्तुतः येथेही प्रत्येक वाक्य स्वतंत्रपणे लक्षात घेतले, की क्र. २ मध्ये केवळ अकर्मक कर्तरी प्रयोग आहे, हे मान्य करावे लागते. येथील 'मला' ही केवळ सामान्यसंबंधबोधक चतुर्थी असल्याची नोंद स्वतः अर्जुनवाडकरांनी केलीच आहे. (पृ. १६६)

तात्पर्य, दादोबा मानतात तसा, किंवा मोडक–अर्जुनवाडकर मानतात, तसा–'कर्मकर्तरी' नामक प्रयोगप्रकार मराठीत नाही.

शेवटी प्रस्तुत चर्चेतून निष्पन्न झालेली मराठी प्रयोगव्यवस्थेची काही वैशिष्ट्ये एकत्र करू.

१. वाक्यातील आख्यातरूपी धातुरूप एवढेच क्रियापद. कृदन्तरूप हा क्रियापदाचा भाग नव्हे.

२. धातूचे प्रथम ताख्याती रूप ज्याला अनुसरते, तो कर्ता. कृदन्तकर्ता हा प्रयोगदृष्ट्या महत्त्वाचा नव्हे.

३. मूळ धातू व साधित धातू यांमध्ये विवेक करून कर्ता ठरवावा लागतो.

४. प्रयोग सांगताना दिलेल्या प्रत्येक वाक्याचा विचार स्वतंत्रपणे करावा लागतो. अर्थदृष्ट्या समांतर वाक्यावरून निर्णय घेऊन चालत नाही.

मु. व पोस्ट : चौल, ता. अलिबाग, जि. रायगड, ४०२२०३

# ' देशीकार लेणे ' : ' निंबार ', ' साउलें '

डॉ. पंडित आवळीकर / डॉ. विजया तेलंग

' ज्ञानेश्वरी 'तील आणि महानुभाव वाङ्मयातील काही शब्द जसेच्या तसे किंवा काही बदल होऊन एखाद्या प्रादेशिक बोलीत आजही– विशेषतः ग्रामीण परिसरात– जिवंत आहेत. एरव्ही हे शब्द ग्रांथिक अथवा नागरी भाषेत आज वापरले जात नसल्याने मृतवत वाटत असतात. आणि त्यांच्या नव्याजुन्या अर्थच्छटा एकमेकांवर अधिक प्रकाश टाकू शकतात, हे भानही हरपू लागते. स्थलकालांच्या मर्यादांवरही मात करून, स्थळकाळभाषादी ( संस्कृत, कन्नड इ. ) मूलस्रोतांच्या अर्थपूर्ण खुणा उरीपोटी जपून उरलेले हे शब्द म्हणजे खऱ्याखुऱ्या अर्थाने ' देशिकार लेणे ' होत. हल्याळी मराठीतील ' निंबार ' आणि ' साउलें ' हे शब्द पाहू.

हल्याळ हे उत्तर कन्नड जिल्ह्यातील, धारवाडपासून ३४ कि. मी. अंतरावरील गाव. निसर्गदृष्ट्या कोकणातील, राज्यशासनानुसार कर्नाटकातील. हल्याळी मराठी ही कोकणी–कन्नड या भाषांच्या संपर्काने समृद्ध बनलेली आहे, तशीच प्राचीन शब्दवैभवामुळे श्रीमंत बनलेली आहे.

## ' निंबार ' :

' निंबार लई हाय ', ' निंबार न्हाय ', निंबार लावलं न्हाय ' यासारख्या वाक्यांतील ' निंबार ' हा शब्द ग्रंथनिविष्ट नाही : कोशातही नाही आणि अन्यत्र ( ' हेंगाडी ' सोडून ) ऐकिवात नाही. ' निंबार ' म्हणजे ' ऊन्ह-कडक ' उन्ह. पण हा शब्द आणि हा अर्थ आला कोठून ?

या शब्दाचे मूळ आणि कुळ ' ज्ञानेश्वरी 'तील ' निबर ' मध्ये आहे. ' ज्ञानेश्वरी 'त सोळाव्या अध्यायात प्रारंभीच ' चित्सूर्या 'चे रूपक आलेले आहे. नवव्या ओवीत ' जेयाचा रश्मिपुंजु निबरु ' असा चरण आहे.[१] सूर्याच्या किरणसमूहासाठी वापरले गेलेले ' निबरु ' हे विशेषण आहे आणि त्याचा सरकारी ' ज्ञानेश्वरी 'तील शब्दकोशात ' प्रखर, तीव्र ' असा अर्थ देण्यात आलेला आहे.[२] सोळाव्या अध्यायाच्या विविध संपादकांनी या चरणाचा अर्थ लावताना ' निबरु ' हे विशेषण मानून असाच अर्थ सांगितला आहे. ' मराठी शब्द-रत्नाकरा 'त आपटे यांनी ' निबर ' म्हणजे ' जून, कडक ', असे म्हटलें असून, त्याचे मूळ म्हणून संस्कृत ' निर्भर 'कडे बोट दाखवले आहे.[३]

मोल्सवर्थ मात्र ' निबर ' म्हणजे ' Sunshine or heat of the sun ' हा अर्थ देतो आणि हे नाम असल्याचे नोंदवितो.[४] ' निबराण्ट ', ' निबराष्ट्र ' हे शब्दही नाम

म्हणून त्याने दिले असून त्यांचा ‘ Sunny place ’ असा अर्थही सांगितला आहे. मोल्सवर्थने या शब्दाच्या वापराचे एकही उदाहरण मात्र दिलेले नाही.

हल्याळी मराठीतील ‘ निंबार ’ मुळे ‘ ज्ञानेश्वरी ’तील ‘ निबरु ’वर काही प्रकाश पडतो काय ? मुळातील ‘ निबरु ’ हे विशेषण, की नाम ? विशेषणाचा नामासारखा उपयोग कधी होतो काय ? ‘ निंबार ’मध्ये अनुस्वार कोठून आला !

‘ जेयाचा रश्मिपुंजु निबरु ’ या चरणात ‘ निबरु ’ हे नाम मानून त्याचा ( कडक ) ‘ ऊन्ह ’ हा अर्थ घ्यावा. असा अर्थ लावण्याची शक्यता ‘ निंबार ’ मुळे निर्माण झालेली आहे.

उपरिनिर्दिष्ट प्रश्नांच्या उत्तरांची दिशा अशी : मुळातील ‘ निबरु ’ हे विशेषण मानले, तरी त्याचे हल्याळी मराठीतील ‘ नामा ’तील परिवर्तन, कन्नडमधील प्रचलित प्रवृत्तीशी सु‘ संगत ’ आहे. ‘ तो **समाधानी** आहे ’ याऐवजी ‘ तो **समाधान** आहे ’ (‘ अवां समाधान इद्दान ऽ ’) किंवा ‘ **रुचकर** ’ झाल्यं ’ (‘ रुची आग्याद ऽ ’) अशा प्रकारे आजही कन्नडमध्ये विशेषणाऐवजी नामरूपाचा वापर होतो. रूप बदलले, तरी अर्थ बदलतो, असे नाही. मुळात नसलेला अनुस्वार शब्दाच्या परिवर्तित रूपात येण्याची प्रवृत्ती ‘ निंबार ’ या ‘ निबरु ’च्या बदललेल्या रूपात आहे.

### ‘ साउलें ’

‘ निंबारात साउलं सुकवायची ’ भाषा आणि पद्धत हल्याळच्या परिसरात नित्याची आहे. ‘ साउलं ’ म्हणजे साडी. ‘ लीळाचरित्र ’, ‘ गोविंदप्रभु ’ या महानुभाव ग्रंथात ‘ साउलें ’ हा शब्द अनेकदा आला आहे. वऱ्हाडीत हा शब्द आज वापरात आहे, की नाही, माहीत नाही. इतक्या शतकांनंतर महानुभाव वाङ्मयात येऊन गेलेला (‘ गेलेला ’ ?) हा शब्द वऱ्हाडा/डी पासून सुदूर असलेल्या हल्याळसारख्या प्रदेशात अशिक्षितांच्या मुखी आजही रूढ असावा, हे लक्षणीय आहे.

‘ गोविंदप्रभुचरित्रा ’त[५] ‘ ओलि साउला ’ ( ३५ ), ‘ पीवळीए पाजणीचा साउला ’ ( ९१ ) आणि ‘ नवा वोलि–सावला ’ ( ३२३ ) या ठिकाणी ‘ साउलं ’ म्हणजे ‘ साडी ’ नव्हे; ते ‘ पुरुषी ’ वस्त्र आहे. ( ३५ ) मध्ये ‘ श्रावणीए वस्त्र–पुजा स्वीकारु ’ हा लीळा-प्रसंग आहे. म्हणून त्या वेळी हा साउला प्रभूंना ‘ वाइला ’, असा निर्देश आहे. ( ९१ ) मध्ये ‘ मादनें जालें ’ मग महदाइसेने गोसावियांसी साउला ‘ ओळगवीला ’ आहे. तर ( ३२३ ) मध्ये गोसाव्यांनी ‘ नीजधामा बीजें केलें ’ तेव्हा ‘ श्रीमुर्तिवरि पांगुरवीला ’ फक्त ( १९२ ) मध्ये ‘ एकु दी आउसे रंगीत साउलें नेसौनि मढासि आली : तीय बरवी दीसतें होती : ’ मध्ये ‘ साडी ’ हा आज शिल्लक राहिलेला अर्थ आहे.

‘ लीळाचरित्रा ’त[६] ‘ साउलेयाचें धोत्र ’ ( पू. ४६ ) मध्ये ‘ सोवळें ’, ‘ ओलि-साउला ’ ( उ. १४३, ) ‘ मग गोसावी एक साउलें देत होते ’ ( उ. २५१ ) मध्ये

' शेला ' असे अर्थ आहेत. म्हणजे पुरुषी वस्त्रांचे संदर्भ आहेत.

' तुमचा साउला मैळेल ' ( उ. ८० ) मध्ये सर्वज्ञांनी जाखुबाईला तिची ' साडी ' मळेल, असे सांगितले आहे. ' साउलें फेडिलें ' ( उ. ९ ) ' तीयें मैळकें ऐसें साउलें नेसलीं असती ' ( उ. ४४ ). मध्ये ' साडी ' हाच अर्थ आहे.

ज्ञानदेवांच्या ' चित्सूर्या 'चे ( कडक ) ऊन्ह ' निंबार 'मध्ये स्थळकाळाला न जुमानता तळपत राहिले आहे आणि सर्वज्ञ-गोसावियांशी संबंधित ' साउलें ' थंडीवाऱ्याला पुरून उरून आजही निंबारात सुकत आहे...

## संदर्भ


१. ज्ञानेश्वरी, ( सं. ) शं. वा. दांडेकर ( ३ ), १६–९, पृ. ६२०.
२. तत्रैव, शब्दकोश, पृ. ८४.
३. मराठी शब्दरत्नाकर, ( सं. ) वा. गो. आपटे, पुणे, पृ. ३२१.
४. मराठी-इंग्लिश शब्दकोश, ( सं. ) मोल्सवर्थ, वरदा, पुणे, पृ. ४६७
५. गोविंदप्रभु चरित्र, ( सं. ) वि. भि. कोलते, अरुण प्रकाशन, मलकापूर.
६. लीळाचरित्र, ( सं. ) वि. भि. कोलते, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९८२,



**मराठी विभाग कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड ५८० ००३.**

# बालकथेची भाषा

## नीलिमा गुंडी

बहुसंख्य बालकथांची कल्पनारंजित भाषा सर्वच लहान मुलांना खरंच आवडते का ?– या प्रश्नाचा आज पुन्हा विचार करण्याची गरज मला अनुभवाने पटली.

त्याचे असे झाले : मी मुलीला परीकथा सांगत होते. मी माझ्या पद्धतीने गोष्ट खुलवून सांगत होते, की परी कशी ढगावर बसून यायची वगैरे. तर 'ढगावर काय कुणी बसतात का ?' म्हणत मुलीने जी हसायला सुरुवात केली, की ती थांबेचना! माझी गोष्ट अशी 'हास्यास्पद' होणे मला अगदी अनपेक्षित होते. एरव्ही भातुकली खेळताना रिकाम्या भांड्यांत नाना पदार्थ पाहू शकणारी ही चिमुरडी, ढगावर बसण्याची कल्पना का नाही स्वीकारू शकत ? हे जाणून घेण्यासाठी मी तिला खूप छेडले. मग उत्तर असे मिळाले, की ती 'छोटी छोटी' आहे, म्हणून तसं 'खोटं खोटं' खेळते ! यात अभिप्रेत असलेली चपराक चांगलीच सणसणीत होती, की मी इतकी मोठी असूनही अशा 'खोट्या' गोष्टी सांगते, म्हणजे काय ?

प्रयोग म्हणून मग मी तिलाच एक गोष्ट पुन्हा पुन्हा सांगायला लावली. ही गोष्ट म्हणजे तिच्या बाबतीत घडलेल्या एका प्रसंगाचेच वर्णन होते. ती एकदा डेक्कन जिमखान्या-सारख्या गर्दीच्या ठिकाणी चुकली होती. काही वेळ एकटी राहिली होती. तर त्या प्रसंगाचे वर्णन ती करते, तेव्हा तिच्या निवेदनाची काही वैशिष्ट्ये सहज टिपता येतात, ती अशी :

तिची वाक्यरचना शिथिल आहे, कारण तिची व्याकरणाची जाणीव प्राथमिक पातळी-वरची आहे. तसेच श्वासावर अजून योग्य तितका काबू नसल्यामुळे तिची वाक्ये ती घर-गळत्या लयीत उच्चारते. आपण निवेदन करीत आहोत, हे भान तिला नाही.

तिच्या दृष्टीने तो प्रसंग, खरे म्हणजे, भावनिक दृष्ट्या तणावपूर्ण होता. पण ती मोजक्या चार-पाच वाक्यांतच तो प्रसंग मांडते. कितीही वेळा, कधीही तिला विचारा, तिच्या वाक्यांचा क्रम सहसा चुकत नाही. त्यात "मी खूप रडले भ्यँ–," आणि "बाबा पळत आले दुडु दुडु" ही दोनच वाक्ये त्या प्रसंगातील भावना पूर्णपणे व्यक्त करतात. एकटी असताना व रडतानाही ती कमालीची जागरूक होती, हे लक्षात येते. कारण ती तपशिलां-मध्ये अजिबात गल्लत करत नाही. तिला कितीही उलट-सुलट विचारले, तरी बाबा 'मंत्र' घेत होते, तेव्हा ती चुकली आणि तिला एका 'केळीवाल्याने' उचलले, या तपशिलांबाबत ती ठाम असते !

( पुढील मजकूर पान २६ वर पहा )

# नाव

## विद्युल्लेखा अकलूजकर

[ ‘ भाषा आणि जीवन ’च्या ७ : ३, पावसाळा १९८९ या अंकात श्रीमती विद्युल्लेखा अकलूजकरांनी अनुवादित केलेली ‘ जाता जाता ’ ही कविता प्रसिद्ध झाली आहे. तिच्याखाली त्यांचं नाव विद्युल्लेखा अकलूजकर असंच मुद्रित झालेलं असलं, तरी त्या अंकाच्या अनुक्रमणिकेत विद्युल्लेखा वाघ या त्यांच्या पूर्वाश्रमीच्या नावानं त्यांचा निर्देश झालेला आहे व त्याचमुळे ७ : ४, दिवाळी १९८९ या अंकातील सूचीमध्येही तेच नाव आलेलं आहे. हे आम्हांपैकी कोणाच्या तरी अनवधानानं झालेलं आहे. ही चूक त्यांनी खेळकरपणे आमच्या निदर्शनास आणून दिली. या चुकीबद्दल दिलगिरी व्यक्त करत असतानाच तिच्यामुळेच एक सुंदर वैचारिक कविता वाचकांच्या हातांत देता आली, याचा आनंदही होतो.-- संपादक ]

### नाव

तेविसाव्या वर्षी
एका दूरदेशाच्या
स्वप्नात शिरताना
घर सोडलं,
देश दुरावला,
आणि इतकी वर्षं
मिरवलेलं नाव सोडलं,
गंगेच्या प्रवाहात
फुलांच्या परडीतून
तेवता दिवा सोडावा, तसं.

ते नाव
आज उण्यापुऱ्या
तितक्याच वर्षांनी
मासिकाच्या पानावर
संपादकांच्या अनवधानानं
अवचित भेटायला आलं.

तरी एकदा दिलं दानं
पुन्हा घेता येत नाही.
मुखवटा इतका घट्ट बसलाय्, की
मूळचा चेहरा
पुन्हा त्यावर चढत नाही.
मिळतात मात्र तिऱ्हाइतांच्या शंका-

" पुन्हा माहेरचं नाव लावते,
म्हणजे फाटलं, वाटतं... "
" तरी बरचं टिकलं, म्हणायचं... "
" मग सध्या काय करते ?... कोणी... "
याला माझ्याजवळ उत्तर नाही !

एकजण प्रत्येक वेळी
नवा घरोबा करताना
स्वतःचं देखील नाव बदलत जाते,
एकजण दुसऱ्या नवऱ्याशी
नांदतानादेखील
पहिल्या नवऱ्याचं नाव लावते,
पहिलीला थिल्लर म्हणून
नाक मुरडतात,
दुसरीला बेइमान म्हणून
हिणवतात.
अशा मतामतांच्या गलबल्यात
उडणारी धूळ
डोळ्यांत गेली, तरी आता पाणी येत नाही,
फक्त घसा कोरडा पडतो.

लक्षात कसं येत नाही त्यांच्या, की
तसं आपल्याला नाव
कधी नसतंच,
असतात त्या नुसत्या उपाधी,
वाट चालताना

कामी येतात, म्हणून अंगाखांद्यांवर
बाळगलेली बोचकी.
एक एक गळून पडेपर्यंत
वाट संपते,
रूपाचं अरूप होतं,
आणि मग मिळालंच, तर
जे नाव मिळतं,
तेवढंच आपलं असतं,
पण तेदेखील त्यांच्यासाठी.

5346 Opal Place, Richmond, BC V7C 5B4 Canada

(पान २३ वरून)

तेव्हा आजकाल आधुनिकतेच्या वाढत्या वेगात मुलांची तर्कशुद्धता आणि सूक्ष्म निरीक्षणशक्ती ही वैशिष्ट्ये वयाच्या मानाने जर लवकर विकसित होत असतील, तर परी-कथांची भाषाही बदलायला हवी.

तूर्त माझ्या गोष्टीतल्या परीने आपले पंख उतरवून ठेवले आहेत आणि आताशा तिची ये–जा विमानातून चालू असते.

६/७०, लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ४११ ०३०

# मराठी–कोंकणी वाद : काही अंत:प्रवाह

रवीन्द्र केळेकर

[ कोंकणी–मराठी वादामध्ये 'कोंकणीवादी' आणि 'मराठीवादी' म्हणवणाऱ्या मंडळींनी एकमेकांची भूमिका नीट समजावून घेण्याचे कष्ट घेतलेले दिसत नाहीत. या वादात गैर-समजाचा भाग किती, तात्कालिक अभिनिवेशाचा भाग किती, ऐतिहासिक सत्य आणि व्यावहारिक धोरण कुठे आणि कसे वेगळे काढायचे, या आणि अशा प्रश्नांची उत्तरे मिळत नाहीत. मराठीत नेहमी लिहिणाऱ्या एका कोंकणीवाद्याची भूमिका या लेखाच्या रूपाने पत्रिकेच्या वाचकांसमोर येत आहे. इतरही भूमिका पत्रिकेच्या वाचकांपर्यंत पोचवायला आम्हांला आनंद वाटेल. सांगणे न लगे, की लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही; आणि की, भूमिकेच्या मांडणीत स्पष्टवक्तेपणा जरूर असावा पण अशा वादामधून तत्त्वबोध व्हावा आणि उभयपक्षीयांनी आत्मपरीक्षणाला प्रवृत्त व्हावे; या अपेक्षेला छेद जाईल, असे काही नसावे. ––संपादक ]

एखादी भाषा ही भाषा आहे, की बोली, हा भाषाविज्ञानाच्या एखाद्या विद्यार्थ्याचा–विद्यालयात बसून करण्याचा अभ्यासाचा किंवा संशोधनाचा विषय बनू शकेल. परंतु हा विद्यार्थी जेव्हा विद्यालयाच्या आवाराबाहेर येऊन समाज-जीवनाचे अवलोकन करायला लागेल, तेव्हा मला खात्री आहे वस्तुस्थितीमधील काही महत्त्वाची तथ्ये लक्षात येऊन तो म्हणायला लागेल,

भाषा, की बोली, या प्रश्नाला आपण देत आलो आहोत, तेवढे महत्त्व त्याला खरोखर नाही. कारण–

१. कोणतीही बोली जेव्हा 'मी भाषा बनणार' या महत्त्वाकांक्षेने भारून जाते– आणि त्यासाठी आवश्यक असलेली अनुकूल राजकीय परिस्थिती प्राप्त करून घेते– तेव्हा ती भाषा बनू शकते.

जगातील सर्व प्रतिष्ठित भाषा एका काळी बोली स्वरूपात होत्या. अनुकूल राजकीय परिस्थिती लाभल्यामुळे त्या भाषा बनल्या.

उदाहरणार्थ, पोर्तुगीज ही स्पॅनिशची बोली आहे, असे म्हणायला आजही जागा आहे. एक स्पॅनिश भाषाच जाणणारी व्यक्ती आणि एक पोर्तुगीज भाषा जाणणारी व्यक्ती यांच्या-मध्ये बऱ्यापैकी संभाषण चालू शकते. पण राजकीय परिस्थितीच्या अनुकूलतेमुळे आज त्या दोन वेगळ्या भाषा गणल्या जातात.

२. राजकीय परिस्थितीच्या अनुकूलतेमुळे बोली जशी भाषा बनू शकते, तशी या अनुकूलतेच्या अभावामुळे भाषा बोली स्वरूपात राहू शकते. तुळू आणि कच्छी या भाषाविज्ञानाच्या दृष्टीने स्वतंत्र भाषा आहेत. त्या जर अजून बोली स्वरूपात राहिलेल्या आहेत, तर त्याचे कारण त्यांना अनुकूल राजकीय परिस्थिती अजून लाभू शकलेली नाही, हेच आहे. अशीच काहीशी स्थिती स्पेनच्या ईशान्य भागातल्या कॅटलन भाषेची परवापरवापर्यंत होती. पोर्तुगीजपेक्षा ती प्रमाण-स्पॅनिशपासून दूर असून तिला अलीकडेपर्यंत बोलीच मानण्यात येत होते.

३. राजकीय परिस्थितीची अनुकूलता लाभली नाही, तर साहित्याच्या दृष्टीने समृद्ध भाषादेखील बोली स्वरूपात राहू शकतात. सूरदासाची ब्रज आणि तुळशीदासाची अवधी समृद्ध साहित्य असलेल्या दोन स्वतंत्र भाषा आहेत. तरीही आज त्या बोली स्वरूपातच जगत आहेत.

४. राजकीय परिस्थिती कधी कधी एकाच बोलीला दोन साहित्यिक भाषा बनवून त्यांना दोन स्वायत्त जगांत विचरायला सोडून देते. उर्दू आणि हिन्दी या भाषाविज्ञानाच्या दृष्टीने दोन स्वतंत्र भाषा नाहीत. एकाच खडी बोलीची ती दोन साहित्यिक रूपे आहेत. केवळ लिपिभेदामुळे आणि लिपींच्या द्वारा लाभलेल्या सांस्कृतिक वारशामुळे त्या दोन स्वतंत्र भाषा मानल्या जात आहेत. उर्दूने स्वतःसाठी अरबी-फारसी लिपी निवडली आणि या लिपीच्या मार्फत मिळालेली इस्लामी सांस्कृतिक परंपरा स्वीकारली; हिंदीने नागरी लिपीला स्वतःची स्वाभाविक लिपी मानली आणि या लिपीमागे असलेली हिंदू–किंवा संस्कृत–संस्कृती स्वीकारली. या दोन कारणांमुळे दोन्ही दोन स्वतंत्र भाषा बनल्या.

या दोन्ही भाषांना ' हिन्दुस्तानी ' या एका नावाखाली आणून त्यांच्यामधली कृत्रिमता नाहीशी करण्याचा आणि त्यांना एक भाषा बनविण्याचा एक प्रयत्न स्वातंत्र्य-संग्रामाच्या काळात महात्मा गांधींनी केला होता. हा प्रयत्न सफल झाला असता, तर राष्ट्रभाषेच्या स्थानावर नियोजित केलेल्या या हिन्दुस्तानी भाषेला इस्लामी आणि हिन्दू या दोन्ही सांस्कृतिक परंपरांचा समृद्ध वारसा लाभला असता अन् लिपीचा प्रश्न विज्ञानयुगातल्या काळाने आपोआप सोडवला असता. परंतु दोन्ही बाजूंच्या अति-उत्साही अन् अति-महत्त्वाकांक्षी आंधळ्या भाषाभिमान्यांनी तो सफळ होऊ दिला नाही. आणि आज तर या दोन्ही भाषा दोन स्वतंत्र राष्ट्रांच्या राष्ट्रभाषा या स्वरूपांत विराजमान झालेल्या आहेत. त्यामुळे त्या एकत्र येण्याची उरली सुरली आशाही आता दुरावली आहे.

कोंकणी-मराठी वादाचे स्वरूप नीट विशद करायला उपयोगी पडतील, या हेतूने सामाजिक भाषाविज्ञानामधल्या या काही ' लीलां 'चे थोडेसे निरूपण मी प्रारंभीच करून टाकलेले आहे.





अनुक्रमणिका

भाषाविज्ञानाच्या दृष्टीने कोंकणी ही मराठीची बोली कधीच नव्हती. मराठीला अत्यंत जवळची, पण एक स्वतंत्र भाषा या स्वरूपातच ती नेहमी जगत आली होती. संक्षेपात सांगायचे झाल्यास–

१. कोंकणीची ध्वनि-प्रकृती आणि मराठीची ध्वनि-प्रकृती एक नाही. कोंकणीच्या ध्वनि-प्रकृतीत तिचा स्वतःचा असा एक वेगळा सूर आहे.

२. दैनंदिन व्यवहारात वापरले जाणारे कोंकणीचे पायाभूत शब्दभांडार (basic vocabulary) तिचे स्वतःचे आहे.

३. कोंकणीची व्याकरणी घडण–स्ट्रक्चर–आणि मराठीची व्याकरणी घडण यांच्यांतही फरक आहे.

४. कोंकणीच्या म्हणी, तिचे वाक्‌-प्रचार याही क्षेत्रांत ती मराठीहून बरीच भिन्न आहे. लोकश्रुती (folklore) चा उल्लेख मी करत नाही. कारण माझा फारसा अभ्यास नाही.

५. मराठी आणि गुजराती किंवा गुजराती आणि हिन्दी या भाषा एकमेकींच्या जितक्या जवळच्या किंवा दूरच्या आहेत तितक्याच, कोंकणी आणि मराठी या भाषा एकमेकींच्या जवळच्या आणि दूरच्या आहेत.

इतकेही असून कबूल करावेच लागेल, की इतिहासकालात कित्येक शतके कोंकणी ही मराठीच्या सान्निध्यात बोली म्हणून राहिलेली आहे. मराठीची बोली म्हणून नव्हे. विकासाची आंतरिक क्षमता असूनही जेव्हा एखादी भाषा प्रतिकूल परिस्थितीमुळे आपला विकास साधू शकत नाही, तेव्हा ती भाषा बोलणारा समाज जवळच्या एखाद्या समृद्ध भाषेची आपल्या सांस्कृतिक अभिव्यक्तीची भाषा म्हणून निवड करत असतो. असे अनेक ठिकाणी आढळून आलेले आहे. अशा भाषांना सामाजिक भाषावैज्ञानिकाने संस्कृतिवाहक भाषा (culture language) हे नाव दिलेले आहे. या नियमानुसार बोलायचे कोंकणीतून, पण लिहिण्या-वाचण्याची प्रवृत्ती चालवायची मराठीतून, ही जी विसंगती गोव्याच्या हिन्दू समाजामध्ये दिसून येते, ती पोर्तुगीजांचे आगमन झाले, त्याच्या पूर्वीपासून कोंकणी भाषकांमध्ये प्रचलित असावी, असे म्हणता येते. अन्यथा फादर टॉमस स्टीव्हन्जना 'ख्रिस्तपुराण' मराठीतून लिहिण्याची आवश्यकताच मुळी भासली नसती. स्टीव्हन्जच्या अगोदरचे गोव्याचे एक मोठे कवी म्हणजे कृष्णदास श्यामा. त्यांचे 'कृष्णचरित्र'देखील हेच दाखवून देते, की बोलायचे कोंकणीतून आणि लिहायचे-वाचायचे मराठीतून, ही प्रथा पोर्तुगीजांपूर्वीपासून गोव्यात प्रचलित होती.

येथे प्रश्न असा येतो, की ज्या पद्धतीची मराठी कृष्णदास श्यामा किंवा टॉमस स्टीव्हन्जच्या काळात गोव्यात लिहिली जात होती, त्या पद्धतीची मराठी महाराष्ट्रात इतर ठिकाणी लिहिली जात होती काय ? की निराळ्या पद्धतीने लिहिली जात होती. स्टीव्हन्ज तर स्पष्ट सांगतो,

की आपण ख्रिस्तपुराण जरी शुद्ध मराठीतून लिहिलेले असले, तरी शुद्ध मराठी गोव्यात सर्वांना नीट समजत नाही. म्हणून आपण त्यात स्थानिक भाषेचे शब्द ' ठांई ठांई मिसरित करून ' त्याचे कवित्व सोपे केलेले आहे. हे सांगताना आपण हे ' सांप्रतच्या कवींच्या रीतीप्रमाणे ' केलेले आहे, असेही एक वाक्य तो जोडतो.* मराठीत जरी लिहिले, तरी लोकांना समजण्यास सोपे व्हावे म्हणून, मराठीत कोंकणी शब्द ' ठांई ठांई मिसरित करण्याची प्रथा त्या काळी गोमंतकात सर्रास प्रचलित असावी, असे म्हणावे लागते. कृष्णदास श्यामांच्या ' कृष्णचरित्रा 'मध्ये देखील अशा प्रकारची कोंकणी-मिश्रित मराठी आढळते. म्हणून ' कृष्णचरित्र ' ही मराठी रचना नसून कोंकणी रचना आहे, असे म्हणणारे तज्ज्ञ खुद्द महाराष्ट्रात आहेत.

स्टीव्हन्जने ' ख्रिस्तपुराण ' प्रथम शुद्ध मराठीत लिहिले. नंतर लोकांना ते समजण्यास सोपे व्हावे, म्हणून त्यानेच त्यात कोंकणी शब्द घालून कोंकणीला ते जवळ आणले आणि नंतर हा सारा द्राविडी प्राणायाम सोडून त्याने आपले ' दौत्रीन क्रिस्तां ' हे पुस्तक मात्र सरळ कोंकणीत लिहिले— हा त्याच्या लिखाणाचा क्रम पाहिल्यास गोव्याच्या लोकांनी स्वतःच्या सांस्कृतिक अभिव्यक्तीसाठी मराठी ही संस्कृतिवाहक भाषा म्हणून स्वीकारलेली असली, तरी ती सर्वांना सुलभपणे त्या वेळी समजत नव्हती, असे अनुमान काढता येते.

आजदेखील या परिस्थितीत फारसा फरक पडलेला नाही. गोव्याच्या हिंदू समाजामध्ये मराठी ही आज संस्कृतिवाहक भाषा म्हणून प्रतिष्ठित आहे. तरीही एक गोष्ट कबूल करावीच लागते, की—

शिकल्यावाचून तेथे कुणाला मराठी येत नाही. शिकल्यावर लिहिता-वाचता आले, तरी सरावावाचून तेथे कोणाला मराठीतून बोलता येत नाही. आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे, मराठीतून अस्खलितपणे बोलण्याचा सराव असूनही मराठीचे दोन कट्टर पुरस्कर्ते किंवा संपूर्ण आयुष्य मराठीच्या सेवेत खर्च केलेले दोन गोमंतकीय मराठी साहित्यिक जेव्हा एकत्र येतात, तेव्हा ते आपापसांत चुकूनदेखील कधी मराठीतून बोलत नाहीत.

ही झाली वरच्या स्तरांतल्या सुशिक्षित वर्गाची स्थिती. तळागाळांतील लोकांपुढे मराठीची स्थिती काय असेल, याची कल्पनाच केलेली बरी.

---

* अ. का. प्रियोळकर Goa rediscovered या पुस्तकात स्टीव्हन्जचे म्हणणे उद्धृत करतात, ते असे :

' हें सर्व मराठियै भासेत लिहिलें आहे...पण सुध मराठी मछिमा लोकांसि नकळे देखुनु...काए केलें, मागिलेआं कवेस्वरांची बहुतेकें अवघडें उतरें सोडुनु सांपुचेयां कविस्वरांचियै रितु प्रमाणे आणियैकें सोंपीं ब्राह्मणांचे भासेचीं उतरें ठाअीं ठाअीं मिसरित करूनु कवित्व सोंपें केलें...'

तळागाळांतील लोकांपैकी ख्रिस्ती बनलेल्या गावडा समाजातील लोकांचे शुद्धीकरण करून त्यांना हिंदू समाजात आणण्याची एक चळवळ मसूरकर महाराजांच्या शिष्यांनी विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात गोव्यात चालविली होती. त्या वेळी महाराष्ट्रातून हिंदू महासभेचे कित्येक पुढारी प्रचारासाठी गोव्यात आले होते. या शुद्धिप्रकरणाचा इतिहास लिहिला गेलेला आहे. त्यात महत्त्वाची एक गोष्ट नमूद करण्यात आलेली आहे— ती अशी, की हे महाराष्ट्रीय पुढारी मराठीतून भाषणे देत. ती गावडा समाजातील लोकांना समजत नसत. म्हणून त्या भाषणांचा त्याच वेळी कोंकणी अनुवाद केला जात असे आणि हे काम जुन्या पिढीतले मराठीचे कट्टर अभिमानी जनार्दन विष्णु कामत पार पाडत.

आजदेखील निवडणुकांच्या वेळी तळागाळांतील हिंदू समाजाची मते मिळविण्यासाठी मराठीवादी नेत्यांना जाहीर सभांतून कोंकणीतूनच बोलावे लागते.

याचा अर्थ काय होतो ?

गोमंतकात आजदेखील खेडोपाडी मराठी नाटके होत असली, आजदेखील कथा-कीर्तने मराठीतून चालत असली, आजदेखील भजने मराठीतली म्हटली जात असली, कृष्ण भट्ट बांदकरांची काही कोंकणी भजने सोडल्यास, तरीही वरच्या स्तरांतील लोकांनी स्वीकारलेली ही संस्कृतिवाहक भाषा तळागाळांतील लोकांपर्यंत तर कधी पोहोचलीच नाही. वरच्या स्तरांतील लोकांमध्ये देखील विशेष दृढमूल होऊ शकली नाही— हाच अर्थ होतो ना ?

आंतरिक क्षमतेच्या दृष्टीने कोंकणी ही तिच्या जवळच्या कुठल्याही विकसित भाषेइतकीच सक्षम आहे. अमुक एक विचार कोंकणीत व्यक्त करता यायचा नाही किंवा अमुक एका पुस्तकाचे कोंकणीत भाषांतर होऊ शकणार नाही— किंवा अमुक एका प्रतीचे पुस्तक कोंकणीत लिहिताच यायचे नाही; असे अजिबात म्हणता यायचे नाही.

तरीही प्रश्न येतोच— कोंकणीत साहित्य निर्माण का झाले नाही ? माझ्या मते याचे उत्तर असे आहे :

१. ज्या लोकांनी साहित्यनिर्मिती करायला हवी होती, त्यांनी ती केली नाही, म्हणून झाले नाही.

२. साहित्यिक भाषा बनण्यासाठी जी राजकीय अनुकूलता आवश्यक असते, ती इतिहासकाळात तिला लाभली नाही, म्हणून झाली नाही. अन्-

३. काही ऐतिहासिक अपघातामुळे कोंकणी समाज एकत्र राहू शकला नाही; महाराष्ट्र, गोवा, कर्नाटक आणि केरळ या चार प्रदेशांत तो विभाजित झाला; खंडित झाला, म्हणून झाली नाही.

तरीही काही गोष्टींचे आश्चर्य वाटते—

कोंकणी अकादेमीमध्ये सातशे—आठशे पानांचे एक जुने बाड येऊन पडलेले आहे. ते हस्तलिखित स्वरूपात आहे. सोळाव्या शतकातल्या प्रचलित गद्यात लिहिले गेलेले हे

'महाभारत' आहे. अन् याचे रचनाकार कृष्णचरित्राचे लेखक कृष्णदास श्यामा हे आहेत, असे डॉ. ख्रुजे पेरेइरा यांचे मत बनलेले आहे. तसा आत स्पष्ट उल्लेखही आहे. कृष्णदास श्यामांच्या मदतीला आणखीन दोघे-तिघे असावेत. त्यांचीही नावे त्यात आहेत.

कृष्णदास श्यामा हा पोर्तुगीजांपूर्वीचा कवी आहे.

मग प्रश्न येतो : पोर्तुगीजांपूर्वी कोंकणीत लिहिण्याची प्रथा गोव्यात चालत होती काय ? लगेच दुसरा प्रश्न उपस्थित होतो : ही प्रथा बंद का पडली ? तिसरा प्रश्न येतो : महानुभावी साहित्य सोडल्यास इतके जुने गद्य मराठीत आहे काय ? की गोव्यात काव्य मराठीत लिहायचे अन् गद्य कोंकणीत अशी प्रथा चालू होती ? ( 'दौत्रीन क्रिस्तां' गद्यात होते, हे लक्षात घ्यावे. ) बरे, त्या काळात कोंकणीत केवळ गद्य लिहिले जात असे, काव्य लिहिले जात नसे, असे तरी म्हणता येईल का ?

कोचीनमधल्या कोंकणी भाषा इन्स्टिट्यूटने 'वेंकटेश कल्याण' नावाचे एक खंडकाव्य अलीकडेच प्रकाशित केलेले आहे. 'श्री व्यंकटाचल माहात्म्य, तृतीय आश्वास' वरून म्हणे, हे कोंकणीत आणले गेलेले आहे. कवी कोण आहे, कळत नाही. परंतु १५८९ साली सारस्वतांच्या कुंभकर्ण मठाचे अधिपती स्वामी सुधीन्द्रतीर्थ कोचीनमध्ये येऊन राहिले. त्यानंतर १५९९ पर्यंतच्या काळात केव्हातरी ते लिहिले गेले असावे, असे त्याचे संपादक प्रो. आर्. के. राव यांचे मत आहे. तेव्हापासून आजतागायत म्हणे, कोचीनचे कोंकणी लोक या भक्तिकाव्याचे पठन रोज संध्याकाळी आपापल्या घरातल्या देव्हाऱ्या-समोर बसून करत असतात.

येथेही एक प्रश्न उपस्थित होतो–

केरळातील कोंकणी लोक हे मूळचे गोव्याचे. गोव्याहून केरळला गेले, तेव्हा ते आपल्या बरोबर आपले कुल-देव घेऊन गेले. तशी आपली संस्कृतिवाहक भाषा मराठीही घेऊन गेले असले पाहिजेत. मग, त्यांनी 'वेंकटेश कल्याण' हे काव्य कोंकणीत का लिहिले ? मराठी त्यांच्या जीवनातून गळून पडली, असे मानायचे, की गोव्याहून केरळला जाताना ते कोंकणीतून काव्यनिर्मिती करण्याची प्रथाही बरोबर घेऊन गेले होते ?

मला या प्रश्नांची उत्तरे ठाऊक नाहीत. ( संशोधनासाठी इथे वाव आहे. ) पण एवढे ठाऊक आहे, की मराठी ही आज सर्व कोंकणी लोकांची सांस्कृतिक भाषा राहिलेली नाही. गोव्याच्या लोकवस्तीपैकी ३३ टक्के लोकांचा– खिश्चनांचा– आज मराठीशी काहीही संबंध नाही. तो तुटला. वाटल्यास, तोडला गेला, असे म्हणू. खिश्चनांशिवाय केरळातील पाच, सहा लाख, त्याचप्रमाणे कर्नाटकातील पंधरा-वीस लाख कोंकणी लोकांचाही मराठीशी संबंध राहिलेला नाही. केरळातल्या कोंकणी लोकांनी मलयालम भाषेचा, तर कर्नाटकातील लोकांनी कन्नडचा संस्कृतिवाहक भाषा म्हणून स्वीकार केला. मलयालम साहित्यात भर घालणारे कोंकणी साहित्यिक होते आणि आहेत. आणि कन्नड साहित्याची भरघोस सेवा करणारेही कोंकणी लेखक होते आणि आहेत. जुन्या काळातील मंजेश्वर गोविंद पै

आणि अलिकडच्या काळातील गिरीश कार्नाड किंवा यशवंत चित्ताल यांची नावे आपणही ऐकलेली असतील. द. रा. बेंद्र्यांनी मराठी भाषक असूनही कन्नडची सेवा केली, काका कालेलकरांनी गुजरातीची आणि बाबूराव पराडकरांनी हिन्दीची केली, तशा प्रकारची ही सेवा म्हणता यायची नाही. गोव्यातल्या बा. भ. बोरकरांनी जशी मराठीची आपली संस्कृतिवाहक भाषा मानून सेवा केली, तशा प्रकारची कन्नड ही आपली संस्कृतिवाहक भाषा आहे, असे मानून पै, कार्नाड, चित्ताल यांनी कन्नडची सेवा केलेली आहे कर्नाटकातील काही कोंकणी लोकांनी आपल्या मुलींना मराठी शिकविली. असेल. पण ती संस्कृतिवाहक भाषा म्हणून शिकवली, की मुंबई–पुण्याकडे त्यांचे विवाह झाले, तर त्यांना उपयोगी पडेल, या व्यावहारिक दृष्टीने शिकवली, हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे. जर व्यावहारिक दृष्टी ठेवून शिकवली असेल, तर तिला त्यांची संस्कृतिवाहक भाषा म्हणता यायचे नाही. मराठीचे संस्कृतिवाहक भाषा या स्वरूपातले अवशेष आज आपल्याला गोव्याच्या दोन अडीच लाख हिंदू समाजामध्येच केवळ पाहावयास मिळतात. इतर कुठेच नाहीत. काही ऐतिहासिक अपघातांमुळे कोंकणी समाज जसा राजकीय दृष्ट्या चार प्रदेशांत विभागला गेला, तसा सांस्कृतिक दृष्ट्याही तो चार किंवा पाच परंपरांत विभागला गेला. मराठी या समाजाला एकत्र ठेवू शकली नाही. त्याला सांस्कृतिक दृष्ट्या कमी अधिक प्रमाणात फक्त त्यांची कोंकणी भाषाच एकत्र ठेवू शकलेली आहे. सर्व प्रदेशांतील आणि सर्व थरांतील कोंकणी लोकांना एकत्र आणणारा दुवा आज फक्त कोंकणी हाच आहे.

बरीच वर्षे कोंकणी लोकांना आपण कोण आहोत, याची जाणीव नव्हती. विसाव्या शतकाच्या दुसऱ्या दशकात त्यांना हळूहळू ही जाणीव व्हायला लागली. केरळमधील काही लोकांना वाटायला लागले, आपण केरळी समाजाशी एकरूप होण्याचा प्रयत्न केला, मल्यालम भाषेची सेवाही यथेच्छ केली. तरीही संपूर्णतः केरळी बनू शकलो नाही. पृथकच राहिलो. कर्नाटकातील लोकांनाही वाटू लागले, आपण कर्नाटकी समाजाशी एकरूप, एकजीव होण्याचा प्रयत्न केला, कन्नड भाषेला स्वतःची भाषा मानून तिची मनःपूर्वक सेवाही केली. पण आपण कर्नाटकी बनू शकलो नाही, वेगळेच राहिलो. गोव्यातील उच्चभ्रू ख्रिस्ती लोक जोपर्यंत गोव्यात राहिले, तोपर्यंत ते स्वतःला पोर्तुगीज समजत राहिले. पण ते जेव्हा पोर्तुगालला गेले, तेव्हा आपण पोर्तुगीज बनू शकलो नाही, बनू शकत नाही, असे त्यांना वाटायला लागले. ख्रिस्ती लोकांपैकी जे पोटासाठी पोर्तुगीजच्या ऐवजी इंग्रजी शिकून पुढे आले, त्यांनाही आपण इंग्रज नाही, अँग्लोइंडियनही नाही, बनूही शकत नाही, असे वाटायला लागले. गोव्यातील हिंदूंना आपण मराठी आहोत, की नाही, हा प्रश्न गोव्यात कधी पडला नाही. पण ते या शतकाच्या प्रारंभी जेव्हा मुंबईला येऊन राहायला लागले, तेव्हा त्यांना आपण जरी स्वतःला मराठी मानले, तरी मराठी लोक आपल्याला आपले

मानत नाहीत, हलके मानतात, आपल्या भाषेला ' हेंगाडी ' म्हणतात, आपल्याला मासळी देखील चोरून खावी लागते, वगैरे कटु जाणीव झाली– अशा वेळी आपण खरे ' कोण आहोत ' हा प्रश्न सर्वांना पडला आणि ते आपली ओळख– आपली identity शोधायला लागले.

–आणि ते जेव्हा आपली identity शोधायला लागले, तेव्हा आपण कर्नाटकी नाही, मराठी नाही, केरळी नाही, पोर्तुगीज नाही, इंग्रज नाही, अँग्लो-इंडियन नाही, आपण कोंकणी आहोत, हा शोध त्यांना लागला. तेव्हापासून कोंकणी समाजामध्ये नवीनच प्रकारचे एक वैचारिक मंथन सुरू झाले. आणि शेवटी निरनिराळ्या प्रदेशांमध्ये विखुरल्या गेलेल्या कोंकणी समाजाचे काही जागृत प्रतिनिधी १९३९ साली ' कोंकणी परिषद ' या छत्राखाली कारवारला एकत्र आले. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे, की ही परिषद, बोलावण्यात प्रामुख्याने कारवार-मंगळूरकडच्या कोंकणी लोकांनी पुढाकार घेतला होता. माधव मंजुनाथ शानभाग हे या परिषदेचे प्राण होते. या परिषदेत गोव्याकडील हिंदू लोकांनी किती भाग घेतला होता, याची नोंद नाही. आधुनिक कोंकणी चळवळीचे आद्य ऋषी वामनबाब वर्दे वालावलीकर ऊर्फ शणै गोंयबाब या परिषदेला हजर होते, की नाही, याचीही खात्रीलायक नोंद मिळालेली नाही. पण गोव्याकडील खिस्ती होते. मंगळूरकडील खिस्तीही होते, हिंदूही होते. केरळमधील हिंदू होते. शानभागांनी सर्वांना एकत्र आणले होते आणि ज्याअर्थी शानभागांचा शणै गोंयबाबांशी घनिष्ठ संबंध होता, त्या अर्थी शणै गोंयबाब प्रत्यक्ष हजर राहिले नसले, तरी in spirit ते हजर होते, असे म्हणावयास हरकत नाही. कोंकणी समाजाची ही एक प्रातिनिधिक परिषद होती. या परिषदेत सर्वांनी एकमताने जे ठरवले, ते असे होते :

आपला समाज विघटित होऊन गेलेला आहे. त्याला पुन्हा संघटित करण्याची वेळ येऊन ठेपलेली आहे. त्यासाठी—

१. ज्या सांस्कृतिक परंपरांचे पोषण आपल्याला आतापर्यंत मिळत आलेले आहे, त्यांना बाधा येऊ न देता आपण कोंकणी भाषेच्या छत्राखाली एकत्र आले पाहिजे आणि उपेक्षित कोंकणीचा विकास केला पाहिजे. कोंकणीचा विकास संतुलितपणे व्हावा, यासाठी सर्वांना समान अशा नागरी लिपीचा आपण स्वीकार केला पाहिजे. आणि—

२. उद्या भारत स्वतंत्र झाल्यावर इतर भाषक समाजाचे निरनिराळे भाषिक प्रांत निर्माण केले जातील, त्या वेळी आपलाही एक कोंकणी प्रांत आपण मागितला पाहिजे.

' एक भाषा, एक लिपी, एक साहित्य ' या सूत्रात स्वतःला गुंफून घेऊन ' एक कोंकणी समाज ' या स्वरूपात आपण पुढे आले पाहिजे, असा निश्चय त्यांनी या परिषदेत घेतला.

यात रेखांकित करण्याजोगे एक वाक्य आहे : ' ज्या सांस्कृतिक परंपरांचे आपल्याला आतापर्यंत पोषण मिळत आलेले आहे, त्यांना बाधा येऊ न देता आपण एक नवीन परंपरा निर्माण केली पाहिजे. ' हे ते होय.

कोंकणी चळवळीचा उगम येथून होतो.

आता आपणच सांगा : कोंकणी समाजाची ही आकांक्षा चुकीची होती, संकुचित दृष्टीची होती, क्षुद्र वृत्तीची होती, असे म्हणता येईल काय ?

एखाद्या समाजाने आपली हरवली गेलेली identity पुन्हा प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न केला, तर त्या समाजाला दोष देता येईल काय ?

या प्रश्नाचे उत्तर आपणांकडून जर नकारार्थी मिळाले, तर आपणांस एक प्रश्न विचारण्याची इच्छा मला आवरता येणार नाही– कोंकणी समाजाच्या या आकांक्षांना विरोध कोणी केला ? केवळ मराठीने ना ? तोही कसा केला ? कोंकणी ही भाषाच नव्हे, तिला व्याकरण नाही, तिला लिपी नाही, तिच्यात साहित्य नाही, साहित्य निर्माण करण्याची क्षमताही तिच्यात नाही– ती मराठीच्या अनेक बोलींपैकी एक बोली आहे, अशा प्रकारे तिला हिणवूनच ना ? तिचे प्रमाण स्वरूप नाही, इकडच्या लोकांना तिकडची कोंकणी कळत नाही, तिकडच्या लोकांना इकडची समजत नाही, अशा प्रकारे तिचे दोष दाखवून तिला लाजवूनच ना ! मराठीचा विरोध जर एवढाच असता, तर विरोधाला उत्तमोत्तम साहित्य निर्माण करून विधायक उत्तर देता आले असते. परंतु मराठी येथे थांबली नाही. ती पुढे गेली. भारताच्या नकाशावरून गोव्याचे– कोंकणीच्या मूळ प्रदेशाचे नाव-निशाण देखील पुसून काढायला ती प्रवृत्त झाली– गोव्याला स्वतंत्रपणे जगण्याचा अधिकारच नाही, महाराष्ट्रातल्या अनेक जिल्ह्यांपैकी एक जिल्हा म्हणून त्याने जगले पाहिजे; हा उद्देश समोर ठेवून तिने गोव्याला महाराष्ट्रात विलीन करण्याची एक मोठी चळवळच उभारली. संपूर्ण महाराष्ट्र पेटवला. याच्याही पुढे ती गेली. स्वतंत्र गोमंतकात जे पहिलेवहिले गोमंतक मराठी साहित्य संमेलन भरवण्यात आले, त्याच्या व्यासपीठावरून तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, साथी नानासाहेब गोरे, आचार्य प्रल्हाद केशव अत्रे वगैरे वगैरे अनेक मान्यवर महाराष्ट्रीय नेत्यांसमोर काकासाहेब गाडगीळांनी एक फतवा काढला– ‘ कोंकणी ? ठीक आहे. तिला घरात अवश्य ठेवा. पण उंबरठ्याबाहेर ती येणार नाही... उंबरठ्याबाहेर फक्त मराठीच चालेल. ’ असा एखादा फतवा मराठीच्या बाबतीत कोणी काढावा, मग मराठी लोकांची प्रतिक्रिया काय होईल, याची आपल्याला कल्पना येईल.

आमचीही हीच प्रतिक्रिया झाली.

मला माफ करा, मराठी लोकांची जी प्रतिमा आमच्या– म्हणजे कोंकणीच्या सेवकांच्या मनांत उभी झालेली आहे, ती फारशी चांगली नाही. ती विस्तारवादी, साम्राज्यवादी, आक्रमक अशा लोकांची आहे.

एक गोष्ट मला येथे आवर्जून सांगायची आहे.

मराठी ही भाषाच मुळात आक्रमक आहे, मराठी लोक स्वभावाने विस्तारवादी आहेत– ही भाषा आणि हे लोक कोंकणीला सुखासुखी वाढू देणार नाहीत. तेव्हा कोंकणीचा पुरेसा विकास होईपर्यंत जर एखाद्या भारतीय भाषेच्या मदतीची आपल्याला गरज भासली, तर

आपण हिन्दी घेऊ. परंतु मराठीला कोणत्याही प्रकारे गोव्यात थारा मिळता कामा नये, ही भूमिका घेतली होती वामनबाब वर्दे वालावलीकर ऊर्फ शणै गोंयबाब यांनी. त्यांना मराठीचा बराच कटु अनुभव आलेला असला पाहिजे. अन्यथा माणूस इतका कडवट कधी होत नसतो. आमच्यापैकी बरेच जण या संस्कारांत वाढलेले होते. अशा या वालावलीकरपंथी लोकांना ' तुमची ही भूमिका बरोबर नाही, ती आपले नुकसान करणारी आहे. आपण मराठी न सोडता कोंकणीचा विकास केला पाहिजे. मराठीही ठेवायची आणि कोंकणीही वाढवायची, या भूमिकेने काम केले पाहिजे. ' हे परोपरीने समजावण्याचा जर कोणी सतत प्रयत्न केला असेल, तर तो काकासाहेब कालेलकर यांनी. १९४५ पासून १९६२ पर्यंत सतत सतरा-अठरा वर्षे ते आम्हांला हेच समजावत आले होते. आमच्यापैकी अनेकांमध्ये मराठीचा जो विरोध होता, तो मऊ करण्याचे काम काकासाहेबांनी केले होते. परंतु महाराष्ट्रातल्या दुसऱ्या एका काकासाहेबांनी जेव्हा कोंकणीतून घराबाहेर बोलायचेदेखील नाही, हा फतवा काढला अन् त्याचा प्रतिवाद महाराष्ट्रात कोणीही केला नाही, तेव्हा कालेलकरांचे शिष्यच म्हणायला लागले, आपल्या काकासाहेबांची ही गांधीवादी भूमिका महाराष्ट्रापुढे चालणार नाही. महाराष्ट्राला त्याच्याच ठोशास ठोसा पद्धतीने उत्तर दिले पाहिजे. आपण शणै गोंयबाबांच्याच भूमिकेला चिकटून राहिले पाहिजे– मराठी जर अशा प्रकारे आक्रमण करणार असेल, तर तिच्याविरुद्ध प्राणपणाने लढून त्याचा प्रतिकार केला पाहिजे. मराठीशी कोणत्याही प्रकारची तडजोड होता कामा नये. जी आपल्या जिवावर उठली आहे, तिला थारा देणे हे धोक्याचे आहे.

कोंकणीवादी इतके कडवट झाले, तर तो सर्वस्वी कोंकणीवाद्यांचा दोष आहे, असे म्हणता येईल काय ? त्याची बरीचशी जबाबदारी मराठी माणसालाही उचलावी लागेल. दुर्दैवाने हा कडवटपणा कित्येक वर्षांपासून एकसारखा वाढतच गेलेला आहे. मुक्त गोमंतकाच्या मागल्या सत्तावीस वर्षांच्या काळात कोंकणीला जे काही मिळाले, ते सर्व तिला मराठीशी संघर्ष करूनच मिळवावे लागले. सुखासुखी मिळालेले नाही. कोंकणीच्या प्रगति-यात्रेत मराठीने पावलोपावली अडथळेच निर्माण केले. अर्थात सारा दोष महाराष्ट्रातल्या मराठी लोकांना मी देऊ इच्छीत नाही, गोव्यात ज्यांना आम्ही ' घरभेदी ' म्हणून ओळखतो, ते गोव्याचे मराठीवादी जर गोव्यात नसते, तर महाराष्ट्रातील मराठी लोकांनी आमच्या राजकीय आणि सांस्कृतिक जीवनात ढवळाढवळ कदाचित केलीही नसती. परंतु त्याचबरोबर हेही तितकेच खरे आहे, की महाराष्ट्रातील मराठी लोक त्यांच्या मागे उभे नसते, तर गोव्याचे राजकीय आणि सांस्कृतिक जीवन प्रदूषित करण्याची हिंमत त्यांना कदापिही झाली नसती. आता आपणच ठरवा– कोंकणी-मराठी वादाचे अन् त्यातल्या कटुतेचे मूळ कोठे शोधायचे ? कोंकणीने मराठीचा विरोध केला असेल. पण प्रश्न असा येतो कोंकणीला मराठीचा विरोध करण्याची आवश्यकताच मुळी का भासावी ? ती कोंकणीच्या मार्गात पावलोपावली अडथळे निर्माण करने, म्हणूनच ना ? मग कोंकणी-मराठीमधील वादाचे आणि तेढीचे मूळ कोंकणीत

नव्हे, मराठीत शोधावे लागेल. जवाहरलालजींच्या काळात दिल्लीतील सत्ताधारी महाराष्ट्राकडे नेल्सनच्या डोळ्यांनी पाहत असतात, असे म्हटले जात असे. महाराष्ट्राकडून ही उपमा उसनी घेऊन मलाही म्हणावेसे वाटते, की मराठी ही कोंकणीकडे नेहमी नेल्सनच्या डोळ्यांनीच पाहत आलेली आहे. अन्यथा सांगा, काकासाहेब कालेलकरांवर महाराष्ट्रात जी यथेच्छ टीका झाली, ती का झाली ? काकासाहेब कोंकणी लोकांच्या आशा-आकांक्षांकडे सहानुभूतीने पाहत होते, म्हणूनच ना ? कवी बोरकरांना मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद का नाकारण्यात आले ? त्यांची मराठी शारदेची सेवा त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांपेक्षा कमी प्रतीची होती, म्हणून ? की ते मराठीचे कवी जरी असले, तरी कोंकणीचे पुरस्कर्ते होते, म्हणून ? शणै गोंयबाब म्हणत असत : ' तुमी मराठीची कितलीय सेवा केली, तिचे खातीर तुमी कितलेंय नाक आदळलें तरूय मराठी सरस्वतीच्या मंदिरात तुमकां उकड्यांलेगीत बसयाचो मान मेळयाचो ना ' हे खरे आहे, असे म्हणायचे ना ? आपण म्हणाल, तुम्हां लोकांना हा मान नाकारणारे काही लोक महाराष्ट्रात अवश्य आहेत, पण त्यांच्यावरून साऱ्या महाराष्ट्राला दोष तुम्ही कसे देता ? दुर्दैवाने ज्यांना आपण ' काही ' लोक म्हणता, त्यांचाच महाराष्ट्रात सर्वांत जास्त जोर आहे. आणि समंजस सज्जन असे जे महाराष्ट्रीय आहेत, ते बहुसंख्य असले, तरी अगदीच उदासीन आहेत. आपण ज्यांना ' काही लोक ' म्हणता, त्यांचाच आम्हांला सर्वांत जास्त उपद्रव झालेला आहे. अन् त्यांचा हा उपद्रव अजूनही चालू आहे.

एक गोष्ट मी मुद्दाम आपल्या निदर्शनास आणू इच्छितो– आमच्या गोव्यात गोवा महाराष्ट्रात विलीन करण्याचे एक आंदोलन सोडल्यास मराठीने कोणतेच आंदोलन स्वतंत्रपणे चालवलेले नाही. जेव्हा जेव्हा कोंकणी स्वतःसाठी काही प्राप्त करण्यास पुढे आली, तेव्हा तेव्हा ते आपल्यालाही मिळाले पाहिजे, म्हणून मराठी आग्रह धरून बसली. कोंकणीने स्वतःसाठी राज्यभाषेचा दर्जा प्राप्त व्हावा, म्हणून एक आंदोलन चालवले आणि तो दर्जा तिने प्राप्तही करून घेतला. राज्यभाषेचे अर्धे आसन आपल्यालाही मिळाले पाहिजे, म्हणून मराठी आता हट्ट धरून बसलेली आहे. कोंकणीने नाना प्रकारची आंदोलने करून गोव्याच्या सरकारला कोंकणीच्या विकासासाठी एक कोंकणी अकादमी स्थापन करण्यास भाग पाडले. मराठीने ताबडतोब आपल्यासाठी एक मराठी अकादेमी स्थापन केली. आणि जेवढे कोंकणीला द्याल, तेवढे आम्हांलाही मिळालेच पाहिजे, असा आग्रह धरला. आणि आमचे मुख्यमंत्री ते जेवढे कोंकणी मागते, तेवढे मराठीला न मागता देऊन टाकतात ! म्हणे, आपण भाषेच्या बाबतीत पक्षपात करू शकत नाही. आपण तटस्थ राहिले पाहिजे. आम्ही म्हणतो, तुम्ही आम्हांला देता, त्याच्या शतपटीने जास्त मराठीला द्या. पण आम्हांला जे कमीत कमी मिळाले पाहिजे, तेवढे द्याल, की नाही ?

कोंकणी–मराठी वादामधील अंतःप्रवाहांची ओळख करून देताना मी येथे काही गोष्टी सांगितल्या. तरीही बऱ्याचशा सांगायच्या राहून गेलेल्या आहेत. १९५३ सालापासून मी

कोंकणी कार्यात प्रत्यक्ष भाग घ्यायला सुरवात केली. आयुष्यातील जवळ जवळ तीन तपे या वादात आणि संघर्षात खर्च केली. वादासाठी आणि संघर्षासाठी आता माझ्यात पूर्वी-सारखी शक्ती राहिलेली नाही, उत्साहही राहिलेला नाही. मागच्या या तीन तपांच्या काळावरून जेव्हा एक दृष्टी फिरवतो, तेव्हा आम्ही कुठे होतो आणि आज कुठे येऊन पोहोचलो आहोत, याची जाणीव होते आणि सुखावतो. त्याचबरोबर, तीन तपांच्या या संघर्षानंतर आपण कुठे पोहोचायला पाहिजे होते, कुठे अडकून राहिलो, याची जाणीव होते, तेव्हा एक प्रकारची खंत अनुभवतो. जिला लिपी नाही, व्याकरण नाही, म्हणून प्रारंभी हिणविण्यात येत असे, ती कोंकणी आपल्या प्रगति यात्रेत झपाट्याने पुढे जात असलेली स्पष्ट पाहतो. स्वतःसाठी ती राज्य निर्माण करू शकलेली आहे. या राज्याच्या राज्यभाषेच्या आसनावरही ती जाऊन बसलेली आहे. देशातली एक महत्त्वाची साहित्यिक भाषा म्हणून साहित्य अकादेमीची मान्यताही तिने मिळवलेली आहे. तिच्या मार्गात मराठीने आता अडथळे निर्माण करू नयेत. कोंकणी जरी कितीही विकसित झालेली असली, तरी दुसऱ्या कोणत्याच देशी भाषेच्या मदतीची गरज भासणार नाही, इतकी ती इतक्या लवकर तरी विकसित व्हायची नाही. कोकणीला तिच्या विकासात मदत करणारी भाषा मराठीच असू शकते. असायला पाहिजे. तेच मराठीचे गोव्याच्या सांस्कृतिक जीवनातले स्वाभाविक स्थान आहे. हे तिचे स्वाभाविक स्थान हिन्दीने किंवा दुसऱ्या कुठल्या भाषेने हिरावून घेऊ नये, अशी जर आपल्याला तळमळ असेल, तर तिला पावलोपावली अपशकुन करणाऱ्या शक्तींना आवरण्याचा प्रयत्न आपण केला पाहिजे. या शक्ती आज गोमंतकात मराठी भाषक समाज आणि कोंकणी भाषक समाज असे दोन भाषक समाज निर्माण करण्याच्या आणि एकाच समाजाची भाषिक फाळणी करण्याच्या प्रयत्नांत गुंतलेल्या आहेत. यांना आवरता येईल काय ! अन्यथा–

मी आपली भीती व्यक्त करून मोकळा होतो. गोव्यात सांस्कृतिक जीवनाची सहभाषा म्हणून मराठीचे भवितव्य धोक्यात आहे.

[ **इतिकथन :** मुंबई विद्यापीठात भाषाविज्ञान विभाग, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मराठी विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने १६–१७ मार्च, १९९० ला भरलेल्या मराठीचा भाषावार प्रांतरचनेनंतरच्या काळातील विकास या चर्चासत्रात निबंधाचे पूर्वरूप वाचले गेले होते. ]

# ' अर्थ ' म्हणजे काय ?

## लीला अर्जुनवाडकर

' भाषा आणि जीवन 'च्या ' शब्द ! नव्हे पोकळ वारा ' या शीर्षकाच्या संपादकीयात ( वर्ष ७, अंक ३ ) प्रा. कल्याण काळे यांनी बोल बोल बोलून काहीही न सांगणाऱ्या लिखाणासंबंधी विवेचन केले आहे. मराठी लेखकांतील नुसती शब्दबंबाळ वाक्ये लिहिणाऱ्या व विधान, मुद्दे यांच्या दृष्टीने काहीही न सांगणाऱ्या एका वर्गाविषयी लिहून त्या वर्गातील लेखनाची काही उदाहरणेही त्यांनी दिली आहेत. एकंदरीनेच असे दिसते, की मुद्देसूद, विधानशील आणि सोपे, प्रसन्न शैलीदार लेखन करणे फार अवघड असते. पण गोंधळाचे, घोटाळ्याचे आणि अवघड लिहिणे सोपे असते. हा सोपा मार्ग स्वीकारण्याचा मोह टाळणे पुष्कळांना अशक्य होते. व्यावहारिक कारणांसाठीदेखील लेख, ग्रंथ यांची भलीमोठी यादी आपल्या नावावर जमा असणे आवश्यक असते. त्याने विद्याशाखीय ( academic ) पुण्य मिळत असते. त्याचे व्यावहारिक प्रयोजन स्पष्ट आहे. प्राध्यापक काळ्यांच्या मूळ मुद्द्याविषयी एकंदरीने दुमत होण्याचे काहीच कारण नाही.

पण या टिपणाचे प्रयोजन वेगळे आहे. आपल्या संपादकीयात भवभूतीच्या ज्या अवतरणाचा प्रा. काळ्यांनी उल्लेख केला आहे, त्यातील ' अर्थ ' या शब्दाचा अर्थ मूळ संदर्भात वेगळा आहे, हे मला सांगायचे आहे. उत्तररामचरित्रातील मूळ अवतरण असे आहे :

> लौकिकानां हि साधूनामर्थं वागनुवर्तते ।
> ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ।।
>
> उत्तरराम १.१०

प्रा. काळ्यांनी या श्लोकातील ' अर्थ ' या शब्दाचा अर्थ फक्त ' अर्थ ' (meaning) असा केला आहे. मुळात तो तसा नाही. ' लौकिक साधू ' म्हणजे केवळ ' पोटभरू साधू, सामान्य लोक. ' त्यांची वाचा, म्हणजे घडलेल्याच गोष्टी, घटना ( अर्थ ) यांचे फक्त वर्णन असते. आधी घटना घडतात. लौकिक साधूंची वाचा त्यांचे केवळ अनुसरण करते. म्हणजे ' खडा न् खडा भविष्य बरोबर पाहायचं आणि सांगायचं, पाहायचं आणि सांगायचं ', असे म्हणणाऱ्या ' स्वयंवर ' नाटकातील दिनेश्वराच्या शब्दांप्रमाणे. उलट, ' आद्य ऋषी ' म्हणजे असे प्रतिभासंपन्न क्रांतदर्शी लोक, की ज्यांना सत्य ज्ञान गवसले आहे. ते ' आविर्भूतज्योतिस् ' किंवा ' साक्षात्कृतधर्मन् ' या वर्गातले असतात. त्यांच्या तोंडून बाहेर पडलेल्या शब्दांमागोमाग सत्य धावत जाते. त्यांच्या शब्दांवर अतिशय शुभ अशा सौंदर्याची शिंपडण




अनुक्रमणिका

झालेली असते. हे आद्य ऋषी जे बोल बोलतात, ते कधीही ' विप्लुतार्थ ' म्हणजे सत्याशी फारकत घेतलेले, घोटाळा करणारे नसतात. अशा लोकांच्या पुढे वाग्देवी, ब्रह्मदेवापुढे जशी सरस्वती, तशी एखाद्या दासीसारखी लवत असते. त्यांच्या तोंडून बाहेर पडणारे शब्द खरे करण्याची जबाबदारी सत्यानेच स्वीकारलेली असते. म्हणून प्रत्यक्ष सत्य त्यांच्या वाणीचा पाठपुरावा करते.

भवभूतीने वाणीच्या अनेकांगी अपार सामर्थ्याविषयी उत्तररामचरितात पुष्कळ उल्लेख केले आहेत. हे सामर्थ्य ऋग्वेदाच्या वागाम्भृणीय (ऋ. १०.१२५.) या प्रसिद्ध सूक्तात वर्णिले आहे.

यं कामये तं तमुग्रं कृणोमि ।
तं ब्रह्माणं तमृषिं तं सुमेधाम् ॥

असे प्रत्यक्ष वाणीने तेथे म्हटले आहे. (पु. शि. रेग्यांनी हा मंत्र ' सावित्री 'च्या पहिल्या पानावर उद्धृत करावा, हे किती अन्वर्थक आहे!) हा असा वरदहस्त ज्यांना लाभलेला असतो, ते फार दुर्मीळच असणार. शब्दांचे नुसते रंगीत फुगे उधळणे तसे सोपे असते. ते उधळणारे, भवभूतीच्या शब्दांत सांगायचे, तर ' लौकिक साधू 'ही नसतात. ते म्हणजे ' दिसामाजी काही तरी ते लिहावे ' या समर्थोपदेशाचा पाठपुरावा करून, अक्षरशः ' काही तरी ' लिहिणारे. ते नेहमीच पुष्कळ असणार.

**स. प. महाविद्यालय, पुणे ३०**

# विविधतेतून एकता, की एकतेतून विविधता ?

**सत्त्वशीला सामंत**

' भाषा आणि जीवन 'च्या दिवाळी १९८९ च्या अंकातील डॉ. श्रीमती विजया देव यांचा ' साहित्येतर अनुवाद-प्रक्रिया ' हा उद्बोधक लेख वाचला. त्यातील अखेरच्या भागात ' पारिभाषिक संज्ञा या सर्व भारतीय भाषांसाठी एकच असाव्यात व संस्कृत हा पाया असल्यामुळे हे शक्यही आहे, ' असे विधान आहे. सध्या समान परिभाषा अस्तित्वात नाही, हे दर्शवण्यासाठी त्यांनी एक उदाहरणही दिले आहे.

केंद्र सरकारच्या विधी मंत्रालयात ' राजभाषा खंड ' नावाचे एक कार्यालय असून त्यांच्या देखरेखीखाली केंद्रीय कायद्यांची सर्व भारतीय भाषांत भाषांतरे केली जातात. त्यांनी देखील ' समान परिभाषा ' हें मार्गदर्शक तत्त्व स्वीकारले आहे. पण ते अमलात आणतांना

बऱ्याच व्यावहारिक अडचणी उद्भवतात. संस्कृत हा सर्व भारतीय भाषांचा मूलाधार आहे. हे गृहीतक मुळात चुकीचे आहे. कारण द्राविड कुलातील भाषा याला अपवाद आहेत. मात्र द्राविड भाषांमध्ये संस्कृतचा बराच मोठा शब्दसंग्रह अंतर्भूत झाला आहे, हे खरे. त्यामुळे अनेक संस्कृत शब्द सर्व भाषांमध्ये आढळून येतात. परंतु दुसरी अडचण अशी, की कित्येकदा एक समान संस्कृत शब्द वेगवेगळ्या भाषांमध्ये वेगवेगळ्या– कधीकधी तर परस्परविरुद्ध अर्थांनी देखील प्रचलित झालेला दिसतो.

उदाहरणार्थ,

| संस्कृत शब्द | | अर्थ |
|---|---|---|
| १) साक्षर | (गुज.) | learned person |
| | (मरा.) | literate person |
| २) जन्तु | (तेलु.) | big animal |
| | (मराठी) | small insect |
| ३) प्रबंध | (हिन्दी) | management, arragement |
| | (मराठी) | Thesis |
| | (तेलु.) | Poetic Composition |
| ४) शिक्षा | (हिन्दी) | education |
| | (मराठी) | punishment |
| ५) नियोजन | (हिन्दी) | employment |
| | (मराठी) | planning |
| ६) विधी | (हिन्दी) | Law |
| | (मराठी) | rite |
| | (मल्यालम्) | decree |
| ७) नियम | (मराठी-हिन्दी) | rule |
| | (मल्यालम्) | law, legislation |
| ८) यातायात | (हिन्दी) | communication |
| | (मराठी) | Strain, trouble |
| ९) जातीय | (हिन्दी) | Communal, caste-based |
| | (तेलुगु/बंगाली) | national |
| | (गुजराती) | sexual |
| १०) आंतरजातीय | (मराठी) | intercaste |
| | (तेलुगु) | international |

| | | |
|---|---|---|
| ११ ) राष्ट्र | ( मराठी ) | nation |
| | ( तेलुगु ) | State ( as Andhra ) |
| १२ ) देश | ( मराठी ) | Country |
| | ( तेलुगु ) | State ( as in तेलुगुदेशम् ) |
| १३ ) प्रवाह | ( मराठी ) | Stream |
| | ( कन्नड ) | flood |
| १४ ) प्रमाद | ( मराठी ) | error, lapse |
| | ( तेलुगु ) | accident |
| १५ ) प्रपंच | ( मराठी ) | worldly affairs |
| | ( तेलुगु ) | world |
| १६ ) साक्षात्कार | ( मराठी ) | revelation |
| | ( हिन्दी ) | interview |

तसेच एकाच संकल्पनेसाठी वेगवेगळ्या भाषांत वेगवेगळे प्रतिशब्द प्रचलित आहेत.

उदाहरणार्थ :

| इंग्रजी | मराठी | तेलुगु | मलयालम् | उर्दू | हिन्दी |
|---|---|---|---|---|---|
| Govt. | सरकार, शासन; | प्रभुत्वम्; | —; | हुकुमत; | सरकार |
| Religion | धर्म; | मतमु; | —; | मजहब; | धर्म |
| Interview | मुलाखत; | —; | —; | —; | साक्षात्कार |
| Legislature | विधिमंडळ; | —; | नियमसभा, | मजलिस; | धारासभा |

विस्तारभयास्तव ही यादी लांबवणे इष्ट नाही. आता या सर्व भाषांमध्ये समन्वय घडवून आणायचे ठरवले, तर कोणत्या भाषेचे लोक तडजोडीसाठी आपली मूळ रूढी सोडून देण्यास तयार होतील ? हे मतैक्य घडवून आणणे ही फार कठीण गोष्ट आहे. कारण मूठभर विद्वानांनी एखाद्या सभागृहात ( हस्तिदंती मनोऱ्यात ? ) बसून केलेले पारिभाषिक मतैक्य सामान्य स्थानिक जनतेवर लादता येत नाही. ' राजभाषा खंड ' कार्यालयाने इतर भाषांवर कित्येक शब्दांची सक्ती करून ' अखिल भारतीय एकरूप शब्दावली ' पाडण्याचा प्रयत्न केला. मराठीभाषक अधिकाऱ्यांनी हिंदीशी मिळते घेण्याची भूमिका घेतली, पण दाक्षिणात्य भाषांच्या अधिकाऱ्यांनी हे तत्त्व साफ धुडकावून लावले. परिणामी, ' सर्वसमान परिभाषे 'चे तत्त्व तर अमलात आले नाहीच; उलट, काही अवघड व बेंगरूळ शब्द मराठीच्या माथी बसले. उदा., provision ( of law ) ' तरतूद ' ऐवजी ' उपबंध ' हा प्रतिशब्द आला. कायद्याची ही कृत्रिम परिभाषा महाराष्ट्रातील वकीलवर्ग व न्यायाधीश





अनुक्रमणिका

वर्ग यांच्या पचनी पडण्यासारखी नाही; आणि त्यामुळे मराठीला विरोध करण्यास आणखीच बळ चढणार आहे. हिंदीच्या दडपणाखाली स्वीकारलेली ही मराठी परिभाषा मराठीचा न्यायालयात प्रवेश होण्याच्या मार्गात कायमचा अडसर होऊन बसली आहे.

म्हणून सर्वसमान परिभाषा हे आदर्श ध्येय असले, तरी ते वास्तवापासून फार दूर आहे व व्यवहारात उतरवणे फार अवघड आहे, असे खेदाने म्हणावे लागते. सर्व भारतीय भाषांना अपरिचित असलेल्या नवीन संकल्पनांच्या बाबतीत मात्र कदाचित हे तत्त्व अवलंबिता येईल.

M 3/1, हीरामणि रतन सोसायटी, बांगुर नगर, महात्मा गांधी मार्ग,
गोरेगाव ( पश्चिम ) मुंबई ४०० ०९०

## राहूनच गेलं

श्री. व सौ. सुखात्मे
घरात बसलेली सतत टीव्ही पाहात.
ती फक्त टीव्हीच पाहात.
एक शब्दही एकमेकांशी न बोलता.
आणि अचानक टीव्हीवर व्यत्यय झळकला.
‘ कसं काय ? ’ तो तिला म्हणाला;
‘ आपण पूर्वी कधी भेटल्याचं आठवत नाही.
माझं नाव सुखात्मे. तुमचं ? ’
‘ माझंही तेच ’ ती म्हणाली.
‘ म्हणजे तुम्हांला काय म्हणायचंय ? ’
तो उद्गारला,
“ याचा अर्थ आपण दोघे...”
एवढ्यात व्यत्यय दूर झाला,
आणि त्यांना जे शोधून काढायचं होतं
ते राहूनच गेलं.

Eve Merriam यांच्या Tee Vee कवितेचं स्वैर रूपान्तर.

प्रेषक : सीताराम रायकर, पुणे.





अनुक्रमणिका

# मराठी व्याकरणाची चिकित्सा व समालोचन

मराठी व्याकरण विवेक. लेखक : प्रा. माधव ना. आचार्य, जि. रायगड. संजय प्रकाशन, तीनशेएक, १९९०. १३७ पृष्ठे; मूल्य : ५५ रुपये.

**परीक्षण-लेखक : विजया देव**

प्रा. माधव ना. आचार्य यांचे नाव 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांच्या चांगल्या परिचयाचे आहे. मराठी व्याकरणातील विविध बारकावे हा त्यांच्या चिंतनाचा विषय असलेला आपल्याला नेहमीच दिसून येतो. व्याकरणातील समस्यांची सोडवणूक करण्याच्या या दीर्घ उद्योगातूनच या पुस्तकाला मूर्त रूप मिळाले आहे.

या पुस्तकाचे स्वरूप थोडक्यात त्यांच्याच शब्दांत असे सांगता येईल : (मराठी व्याकरण परंपरेत) घडणकार व परीक्षणकार हा उघडच प्रामाण्यभेद आहे. त्यामुळे मराठी व्याकरणाला या दोन्ही प्रवाहांतून काही व्यवस्थासूत्रे मिळत गेली आहेत. अशा व्यवस्था-सूत्रांची यावत् शक्य निवड करावी व यथाशक्ती मांडणी करावी, या हेतूने प्रस्तुत पुस्तकाचा प्रपंच उभा केला आहे. त्याच्या नावातील 'विवेक' हा शब्द एवढ्याच मर्यादित अर्थाने योजला आहे.

यात हाताळलेले विषय पाहता हे पुस्तक बी. ए., एम्. ए. चे विद्यार्थी, तसेच प्राध्यापक या सर्वांना उपयुक्त वाटेल, असेच आहे.

एकंदर चौदा प्रकरणे असलेल्या या पुस्तकाचे विवेचनदृष्टया साधारणपणे तीन भाग पडतात. पहिली तीन प्रकरणे, तसेच तेरावे 'वाक्यपृथक्करण' हे प्रकरण यांचा एक भाग कल्पिला, तर यांमध्ये भाषेचा काहीसा व्यापक भूमिकेवरून विचार येतो. उदाहरणार्थ, मराठी व्याकरण-परंपरेचे स्वरूप व चिकित्सा, व्याकरणग्रंथकारांचे घडणकार व परीक्षणकार असे प्रवाह, व्याकरणशास्त्राचे स्वरूप व प्रयोजन, व्याकरणाची कक्षा, वाक्यविग्रहपद्धतीची मर्यादा, इत्यादी. यातून वाचकाला भाषाभ्यासविषयक दृष्टी मिळते. भाषेबद्दलचे पूर्वग्रह दूर होतात. व्याकरणाच्या कक्षेत काय येते व काय येत नाही, याविषयी विद्यार्थ्याला समज प्राप्त होते.

प्रकरण चार ते बारा या प्रकरणांमध्ये अनुक्रमे वर्णविचार, शब्दविचार, वाक्यविचार यांचा उपयुक्त असा ऊहापोह केलेला आहे. हा विवेचनाचा दुसरा भाग कल्पिता येईल.

—आणि टिपणे हा तिसरा. या आधीच्या तेरा प्रकरणांमधून आलेल्या काही विषयांबद्दल स्पष्टीकरण या प्रकरणात आलेले आहे.

या पुस्तकातील विवेचनाचे वैशिष्ट्य, म्हणजे व्याकरणातील प्रत्येक मुद्द्याचा विचार करताना पारंपरिक व्याकरणातील घडणकार व परीक्षणकार यांची त्या बाबतीतील मतमतांतरे लक्षात घेऊन त्यांतून निष्पन्न झालेले सार शेवटी एकत्र येते. उदाहरणार्थ, विवाद्य विभक्ती या उपप्रकरणात चिपळूणकर, दामले, दादोबा, रा. भि. जोशी, गुंजीकर, अर्जुनवाडकर, कालेलकर, केळकर, इत्यादींच्या मतांचा परामर्ष घेतला आहे व शेवटी मान्य विभक्ती म्हणून ' निर्विवादपणे ' पाच विभक्तींची निवड केली आहे. ही निवड अर्थात वाचकांच्या दृष्टीने वादग्रस्त राहतेच; कारण, सामान्य रूप व संबोधन यांची व्यवस्था कशी लावायची, याचा उलगडा होत नाही.

किंवा, कर्ता या उपप्रकरणात ' मांजराला दूध आवडते ', ' त्याला इंग्रजी येते ' अशा प्रकारच्या वाक्यांमध्ये कर्ता कोणता मानावा, याविषयी चर्चा येते. मराठी व्याकरणातला हा एक त्रासदायक व बहुचर्चित भाग आहे. येथे सर्व मतांची चर्चा करून ' दूध ' हाच वाक्याचा कर्ता मानावा, असा निर्णय ते करतात. पण मांजराला, त्याला या–ला प्रत्ययान्त नामांचे वाक्यात स्थान काय, याविषयी लेखक बोलत नाही. येथे केळकर व धोंगडे यांनी आपापल्या लेखनात या प्रश्नांची सविस्तर चर्चा केलेली आहे. त्यांच्याही मतांची, निष्कर्षांची नोंद येथे झाली असती, तर ही अपूर्णता राहिली नसती.

या विवेचनाची भाषा अत्यंत आकलनसुलभ व विषयाची मांडणी सुबोध आहे. पारंपरिक व्याकरण–परंपरेची चांगली जाण व नव्या विचारांचा परिचय यांमुळे या पुस्तकाचे मूल्य वाढले आहे.

एकशेसदतीस पृष्ठांच्या या पुस्तकाची पंचावन्न रुपये ही किंमत जरा जास्तच वाटते. श्री. चंद्रमोहन कुलकर्णी यांचे मुखपृष्ठ अर्थवाही आहे. पुस्तकाची मांडणी चांगली आहे. अलीकडे मराठी भाषा व व्याकरण या विषयांवर नवनवीन पुस्तके लिहिली जाऊ लागली आहेत. त्यांतील ही भर स्वागतार्ह आहे.

६१/१४, एरंडवन, पुणे ४११००४

## पत्रिकेबद्दलचे वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या-संबंधी [ वृत्तपत्रे आणि पुस्तके नोंदणी अधिनियम, कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून फेब्रुवारी संपल्यानंतर प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकात द्यायचे असते, ते निवेदन ].

१. प्रकाशनस्थळ : पुणे, महाराष्ट्र.
२. प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक : जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबरमध्ये.
३. मुद्रकांचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : विजया देव; भारतीय; ६१/१६ एरंडवणे, आयकर भवनासमोरची गल्ली, पुणे ४११ ००४.
४. मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ००४.
५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : विजया देव; भारतीय; चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, पत्ता कलम ३ प्रमाणे.
६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : अशोक रामचंद्र केळकर; भारतीय; ए-२, परिमल, १२३९ ए, आपटे रस्ता, पुणे ४११ ००४.
७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता, एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे अधिकार किंवा भागधारक असल्यास त्यांची नावे व पत्ते : मराठी अभ्यास परिषद, ए-२, परिमल, १२३९-ए, आपटे रस्ता, पुणे ४११ ००४.

मी विजया देव असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

पुणे, १ एप्रिल १९९०.

विजया देव
प्रकाशक

---

## पैसे पाठवण्याबद्दल महत्त्वाची सूचना

पत्रिकेची वर्गणी किंवा अन्य पैशाचा भरणा व्यवस्थापकीय पत्त्यावर करताना चेक किंवा ड्राफ्ट यांच्या जोडीला मनीऑर्डरने पैसे स्वीकारण्याची पद्धत आतापर्यंत ठेवली आहे. पण मनीऑर्डर स्वीकारण्याची तजवीज नेहमी करणे जिकिरीचे होते असा आजवरचा अनुभव आहे. तरी शक्यतो मनीऑर्डरने पैसे पाठवू नयेत, फक्त चेक किंवा ड्राफ्ट या मार्गाने पैसे पाठवावे किंवा समक्ष द्यावेत अशी सर्वांना विनंती आहे. दुसरा इलाज नसला तरच मनीऑर्डर करावी.

## लेखकांच्या शोधात साठ विषय

भाषा आणि जीवन ३ : २ उन्हाळा १९८५ पृ. ४२-४३ वर एक यादी केव्हापासून आपली वाट पाहत आहे. तिच्याकडे आपण सगळ्यांनी एक नजर टाकावी ही विनंती.

## लेखकांना सूचना

मुद्रणप्रत हस्तलिखित असो किंवा टंकलिखित असो, पण ती सुवाच्य व पानाच्या एकाच बाजूस असावी. (उदाहरणार्थ सर्व टिंबे ठळक काढावी, खोडलेल्या अक्षरांची दुरुस्ती करताना गिचमीड टाळावी, शाई पसरलेली कार्बनप्रत पाठवू नये.) सर्व पाने सारख्याच आकाराची असावी. पानाचा आकार फूलस्कॅप चतुष्पत्री ८ १/२ × ६ ३/४ इंच २१.५ × १८.५ सेंटिमीटर यापेक्षा लहान नसावा, शक्यतो पानाचा आकार फूलस्कॅप द्विपत्री (१३ १/३ × ८ १/३ इंच, ३७ × २१.५ सेंटिमीटर) असावा. पाने एकत्र बांधायला टाचणी किंवा क्लिप पुरे, ती. पक्की शिवू किंवा स्टेपल करू नयेत. ओळीओळीमध्ये आणि पानाच्या चारही बाजूला व्यवस्थित अंतर असू द्या. थोडक्यात गबाळेपणा टाकून मुद्रणप्रत तयार करावी, पाठवण्यापूर्वी स्वतः एकदा तपासून पहावी, आणि संपादक, मुद्रक यांचे काम सोपे करावे.

लेखासोबत चित्रे, आकृत्या, कोष्टके, इत्यादी सामग्री द्यायची झाल्यास ती मजकुराच्या पानावर न टाकता स्वतंत्र पानांवर मुद्रणप्रतीच्या शेवटी जोडावी. अर्थात त्यांच्यासोबतचा खुलासेवजा मजकूर, कोष्टकाचा मथळा, इत्यादी सामग्रीच्या बरोबरच राहावा. मुख्य मजकुरात योग्य जागी वाचकांच्या आणि मुद्रकांच्या माहितीपोटी कंसात 'चित्र/आकृती/कोष्टक १/२...पाहा' अशी सूचना अवश्य टाकावी.

लेखन टोपणनावाने प्रसिद्ध करायचे असो किंवा नसो, पण लेखनाच्या शेवटी थोडी जागा सोडून लेखकाने आपले नाव आणि पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता द्यावा. व्यावसायिक पत्ता वेगळा असला, तर तोही नीट द्यावा. नावामधली आद्याक्षरे लेखनाप्रमाणे न देता मराठी लेखनाप्रमाणे द्यावी. पत्ते पिनकोडसह द्यावे.

निर्णय शक्यतो एक महिन्यात कळवला जाईल. शक्यतो स्वतःजवळ एक जादा प्रत ठेवावी. अस्वीकृत लेखन पुरेसे टपालहशील पाठवल्यास परत केले जाईल. अनावश्यक पत्रव्यवहार टाळावा अशी लेखकांना नम्र विनंती आहे.

लेखाची शब्दमर्यादा ५००० शब्दांपर्यंत ठेवावी. जर तेवढ्या मर्यादेत विषयाला न्याय मिळणार नाही, असे वाटले, तरच त्या शब्दमर्यादेत बसतील, असे दोन किंवा तीन लेखांक पाडून लेख पाठवावा. ही पत्रिका केवळ तज्ज्ञांनी तज्ज्ञांसाठी लिहिलेला मजकूर देणारी पत्रिका नाही, हे लक्षात घेऊन लेखाची भाषा शक्यतो सोपी आणि नेमकी ठेवावी, सैद्धांतिक चर्चा असेल, तिथे परिचयातली उदाहरणे द्यावी, पारिभाषिक संज्ञा वापरल्या तर

त्याचा अर्थ सोप्या शब्दात उलगडून द्यावा, केवळ कंसांत इंग्रजी प्रतिशब्द देणे पुरेसे मानू नये. ( पत्रिकेच्या सर्वच वाचकांना इंग्रजी भाषा येते असे नाही. )

परीक्षणे लिहू इच्छिणाऱ्यांनी संपादकाशी संपर्क साधावा.

पत्रिका ही केवळ भाषिक प्रश्नांचा कणखरपणाने आणि चिकाटीने सामना करण्यासाठी नाही, तर ती शिवाय भाषाव्यवहारातले लावण्य आणि गंमत यांचा आस्वाद घेण्यासाठी किंवा भाषाव्यवस्थेबद्दलचे निखळ कुतूहल शमविण्यासाठी देखील आहे, याचे भान असू दे. अमुक लेखन पत्रिकेच्या प्राप्तीमध्ये बसेल, की नाही याबद्दल शंका असल्यास संपादकांशी संपर्क साधावा. पानपूरकांसाठी मजकूर पाठवला, तर त्याचे स्वागतच आहे.

लेखनाला आधारभूत असा संदर्भ लेखकाचे नाव, शीर्षक, लेखकाच्या जोडीने संपादक किंवा अनुवादक असल्यास त्याचे नाव, प्रकाशनस्थळ, प्रकाशक, प्रकाशनवर्ष असा पुरा द्यावा म्हणजे जिज्ञासू वाचकांची सोय होईल. एकच संदर्भ पुन्हा द्यायचा झाला, तर कित्ता, तत्रैव इत्यादी शब्दांची योजना न करता अत्रे १९५३ किंवा १९५३ : पृ. १३ अशी वापरायला अधिक सोपी पद्धत अनुसरावी.

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक ‘ मराठी अभ्यास परिषद ’ या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्या-तरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षांपैकी असो) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ (१९८३) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक 040048/83

---

*Introducing a new series of Marathi teaching materials for the use of English-knowing learners whether Indian or non-Indian.*

MARATHI STRUCTURAL PATTERNS : BOOK ONE

Illustrative and practice materials, introduction to grammatical structures, and some everyday communication and vocabulary woven into 32 convenient units. 470 pages; 1982; Rs. 150

MARATHI CONVERSATIONAL SITUATIONS

Fourteen conversations ranging from Getting acquainted to Meeting officials. 248 pages; 1983; Rs. 90

MARATHI READINGS

Twentyfive adult reading units to complement and follow the preceding, covering narration, description, letterwriting, and other modes. 89 pages; 1983; Rs. 50

MARATHI VOCABULARY MANUAL
MARATHI ILLUSTRATED VOCABULARY

Companions to the rest : Classified Marathi-English English-Marathi Vocabularies. 86 pages; 1983; Rs. 75. 45 pages; 1983; Rs. 35

Handsomely produced set in Crown Quarto ( $9\frac{1}{2}$" × $7\frac{1}{2}$" ); Rs. 400 for the set; more volumes to follow to cover more advanced stages.

The authors, Dr. Maxine Berntsen and Jai Nimbkar, have brought their extensive experience and knowledge of traditional as well as modern methods to bear on this collaborative effort to fill a serious gap. The recent realization of the need for the teaching of Marathi as a second language has made all of us acutely aware of the paucity of such carefully prepared materials that can be used in the classroom as well as in a 'self-taught or' tutorial' approach.

Available from the publishers: ( 1 ) Marathi Abhyas Parishad, 1 / 8 Agarkarnagar, Pune 411 001. ( 2 ) Granthali, 34/902 Nehrunagar, Bombay 400 024. Also from : International Book Service, Deccan Gymkhana, Pune 411 004.

Libraries get a 10% discount; members of Parishad or Granthali get a 50% discount. Outstation cheques should add Rs.2 towards collecion charges.